# करायला गेलों एक

तीन अंकी तुफान विनोदी नाटक

लेखक

कवि बाबूराव गोखले

काँटिनेंटल् प्रकाशन, टिळक रोड, पुणें.

# करायला गेलों एक

तीन अंकी तुफान विनोदी नाटक

लेखक

कवि बाबूराव गोखले

कॉंटिनेंटल् प्रकाशन, टिळक रोड, पुणें

प्रकाशक :
अनंत अंबादास कुलकर्णी
कॉंटिनेंटल् प्रकाशन,
१९६।१९, सदाशिव, पुणें २.



चित्रकार : श्री. फडणीस
पहिली आवृत्ति : मे १९५५
दुसरी आवृत्ति : नोव्हेंबर १९५५
किंमत : पावणेदोन रुपये

मुद्रक :
दा. त्र्यं. जोशी
चित्रशाळा प्रेस,
१०२६, सदाशिव, पुणें २.

अत्रे गुरु,

तुमची ही विद्या तुम्हालाच—

– बाबूराव गोखले

# रसिकांच्या कोर्टांत आमचा कबुलीजबाब !

## युवर ऑनर,

आम्ही "करायला गेलों एक", "अन् झालं भलतंच": आम्ही आपली तीन तास गंमत करायला गेलों, पण अभावितपणें आपले जबडे आणि बरगड्या दुखविण्याचा "गुन्हा" आमच्या हातून घडला गेला. पण आम्ही कोर्टाच्या निदर्शनाला आणूं इच्छितों कीं, आत्तांपर्यंत अवघ्या दीड महिन्यांत सतत वीस वेळां आमच्या हातून हा "गुन्हा" घडला असूनहि तो वारंवार, पुन्हा पुन्हा करण्यास आपणच आम्हांला प्रवृत्त करीत आहांत–यापुढें करणार आहांत–आणि आम्हीहि तो अगदीं 'रंगून' करणार आहोंत–ही घटना आमच्या बचावाच्या दृष्टीनं अत्यंत महत्त्वाची आहे.

युवर ऑनर, आपण आमचा निकाल लावण्यापूर्वी, आमच्या गुन्ह्याचा "हेतु" आपण लक्षांत घेणं जरूर आहे.

विनोदाचार्य प्रल्हाद केशव अत्रे हेच आमच्या या गुन्ह्याचं "स्फूर्तिस्थान" आहेत. आम्ही वयानं 'मायनर' असतांना त्यांनींच असल्या गुन्ह्यांची रूपरेषा, अगदीं 'साष्टांग नमस्कार': घालून आमच्या-पुढं वाढून ठेवली होती. गेलीं बावीस वर्षे त्यांनीं ज्या तुम्हांला 'हसवून लट्ठ' केलं होतं, त्या तुम्हांला आम्ही आज हसवून तुमच्या 'लट्ठपणाला बांधेसूद' करण्याचा प्रयत्न केला–हाच काय तो आमचा गुन्हा !

शिवाय आमचा हा 'खाजगी' गुन्हा रंगभूमीच्या चव्हाट्यावर मांडण्यांत, आधींच (रंगभूमीवर !) कांहीं "जाऊन आलेल्या" सराईत पुरुष–गुन्हेगारांबरोबर कांहीं संभावित स्त्री–गुन्हेगारहि आमच्या 'टोळींत' सामील झाले–हा काय आमचा दोष !

**पुरुष–गुन्हेगारांची यादी**—राजा गोसावी, प्रभाकर मुजुमदार, शरद् तळवलकर, एम्. ए., शामदत्त महाराव, गणपतराव झरकर, प्रा. आधत्‌राव.

स्त्री–गुन्हेगारांची यादी—श्रीमती इंदिरा चिटणीस, सौ. इंदू मुजुमदार, गौरीबाई, शीला गुप्ते–आमच्या कुटुंबाचाहि यांत ‘ अप्रत्यक्ष हात ’ होता, पण त्याला आपण ‘ संशयाचा फायदा ’ द्यावा ही विनंती.

आतां आणखी एक खुलासा ! हा गुन्हा ‘ पचल्यामुळं ’ तो “ विदेशी आहे काय ” ? यासंबंधीं एतद्देशीय टीकाकार-गुन्हेगारांत कुजबुज सुरू झाली आहे. ती विरल्यावर त्यासंबंधीं मला काय सांगायचं तें मी वरच्या कोर्टांत सांगेन.

या गुन्ह्याला “ छापील स्वरूप ” देण्याचा गुन्हा, “ कॉन्टिनेन्टल् प्रकाशना ” चे श्री. अनंतराव कुलकर्णी, चित्रशाळा-प्रेसचे मुद्रक आणि व्यंगचित्रकार फडणीस यांनीं केला. त्याला आम्ही सुतराम् जबाबदार नाहीं.

आमचा हा कबुली जबाब आम्हीं कुणाच्याहि दडपणामुळं दिला नसून तो स्वदस्तुरच्या अक्कलहुशारीनें ( येथें आमच्या अकलेचं अस्तित्व अध्याहृत आहे ! ) आणि ( या ‘ टू परसेंट ’ च्या दिवसांत शक्यच नसल्यामुळें ) निशापाणी न करतां दिला असे !

अक्षय्यतृतीया
श्रम–विश्राम
४०३/२ सदाशिव, पुणें २

निशाणीचा अंगठा दाखवून कोर्टाची बेअदबी करूं न इच्छिणारा,

—बाबूराव गोखले

## पुनश्च वॉरंट

## युवर ऑनर—

गेल्या " तारखेला " आम्ही आपल्याला निक्षून बजावलं असतांहि आपणच आम्हांला आजपर्यंत एकंदर ८५ वेळां हा " गुन्हा " करायला प्रवृत्त केलं अन् आम्हीं तो केला ! इतकंच नव्हे तर यापुढं आमच्या " गुन्ह्यांची " शताब्दि......... द्विशताब्दि......... काय होईल तें सांगतां येत नाहीं ! तेव्हां हें " तारखा लांबवण्याचं " तंत्र सोडून एकदम आमचा निकाल लावा !

आणि हो ! " कॉंटिनेन्टल प्रकाशना " च्या अनंतराव कुलकर्ण्यांना आपण " माफीचा साक्षीदार " करणार असल्याचं आम्हीं ऐकलं. कृपा करून अशी लावालावी करूं नका.

आतां आम्ही इतके निर्ढावलेले गुन्हेगार झालों आहोंत कीं आपण आम्हांला " जन्मठेप " दिलीत तरी त्याची आम्हांला पर्वा नाहीं, नव्हे ! आम्हांला " जन्मठेपच " द्यावी ही विनंति !

आपला,

—नांव आपल्या दप्तरीं आहेच !

या नाटकाचा प्रथम प्रयोग "श्री स्टार्स" पुणें या संस्थेनें पुणें येथें "भानुविलास" नाट्यगृहांत गुरुवार ता. ७ एप्रिल १९५५ रोजीं रात्रौ ९ वाजतां सादर केला. आणि अवघ्या सात महिन्यांत—पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीचे वेळी—या नाटकाला एकूण ८५ प्रयोग होण्याचें भाग्य लाभलें.

संयोजक—गणपतराव झरकर
नेपथ्य—जयवंत वालावलकर
आणि आपटे
रंगभूषा—यशवंत गोसावी

ध्वनिसहाय्य—नाना आपटे
जाहिरात—वि. वि. बापट
संस्था-सल्लागार—प्रा. राव
सेट—चित्रकार केळकर



**शंखनाद**
शरद् तळवलकर



**नूतन**
शीला गुप्ते



**हरिभाऊ हर्षे**
राजा गोसावी



**गौरीबाई गोवेंकर**
गौरीबाई



**नीतिनबाबू**
शामदत्त महाराव

**मम्मीसाहेब**
इंदिरा चिटणीस











| | | | |
|---|---|---|---|
| **मामा मालवणकर** | **झेलम** | **झारासिंग** | **लाला** |
| बाबूराव गोखले | इंदु मुजुमदार | प्रभाकर मुजुमदार | डॉ. नेरेकर |

# १

[ स्थळ—'टिमकी'चे संपादक मामासाहेब मालवणकर यांचा दिवाणखाना. दिवाणखान्यांत जवळ जवळ अंधारच असतो. वेळ—सकाळची. क्षणभरानं, मागं असलेल्या प्रवेशद्वारांतून 'टिमकीचा' बातमीदार—शंखनाद— वय वर्षे सुमारें ३२ – हातांत एक पार्सल घेऊन दबकत दबकत येतो आणि प्रेक्षकांच्या उजव्या हाताला असलेल्या दारांतून हलक्या आवाजांत— ]

शंखनाद : मामासाहेब—अहो मामासाहेब [ तोंच टेलिफोनची बेल वाजते. शंखनाद घाबरतो. डाव्या हातच्या दारांतून मामासाहेबांच्या पत्नी—ममीसाहेब—वय सुमारें ४५ पण वेषभूषा—हावभाव—वय वर्षे २० प्रमाणें—प्रवेश करतात. दिवे लावतात. शंखनादाची आणि त्यांची नजरानजर होते. शंखनादाच्या हातांतून पार्सल गळून पडतें. टेलिफोनकडे जातां जातां ]

ममी : काय हो शंखनाद ? यावेळीं काय काम होतं ? दैनिक 'टिमकी'ला एखादी खास बातमी नाहीं ना मिळाली ?

शंखनाद : नाहीं—पण—ते—अं—तुम्ही फोन घ्या आधीं. ( पार्सल लपवतो).

ममी : ( फोनमध्यें ) हॅलो ? कोण ? गौरीबाई गोवेकर ? ( शंखनाद दचकतो ) बाई, तुमचा नंबर चुकलेला दिसतो. हें एका संपादकाचं घर आहे.

त्यांच्याशींच काम आहे ! ते झोपलेत अजून. हो–रात्रभर छापखान्यांत अंकाचं काम चाललं होतं. ( शंखनाद कपाळावर हात मारतो. ) काय ? तुमच्या-बरोबर होते ? ( शंखनाद बसतो. ) मी ? मर्मीसाहेब– ( रागानें टेलिफोन ठेवते. ) काय हो, बातमीदारसाहेब, मालकांनीं छापखान्यांत नवीन बाई कामाला ठेवली आहे काय ?

**शंखनाद** : नाहीं–म्हणजे मला माहीत नाहीं. गेले आठ दिवस मी दिल्लीला मुलाखतींच्या मुशाफरीवर गेलों होतों.

**मर्मी** : ( त्यांची थाप उमगून ) हं, आणि तुमच्या हातांत हें काय आहे ?

**शंखनाद** : ( पार्सल लपवीत ) नाहीं–आपलं तें हें–हो–आमच्या दैनिक 'टिमकी'चे ब्लॉक्स आहेत.

**मर्मी** : मग असें त त प प काय करतां आहांत ? पाहूं मला—

**शंखनाद** : हो–पण मामासाहेबांच्या परवानगीशिवाय—

**मर्मी** : मी तुमची मालकीण आहें हें विसरलां वाटतं ? ( तो पार्सल देतो. त्या उघडतात. त्यांतून पातळं निघतात. ) हे तुमच्या 'टिमकी'चे ब्लॉक्स होय ? आणि ब्लॉक्स जॉर्जेटचे केव्हांपासून व्हायला लागले ?

**शंखनाद** : ( घाबरत ) अरेच्या ! मीं चुकून भलताच गठ्ठा आणला वाटतं ?

**मर्मी** : कोणाचीं आहेत हीं पातळं ? त्या गौरीबाई गोवेकरणीचीं ?

**शंखनाद** : मला माहीत नाहीं. काम संपून पहाटे आम्ही टॅक्सींतून घरीं आलों. मामासाहेब वर आले–नंतर पाहतों तों टॅक्सींत हा गठ्ठा. मला वाटलं 'टिमकी'चे ब्लॉक्स असतील. म्हणून वर आलों तर—

**मर्मी** : माझी गांठ पडली. शंखनाद, गांठ माझ्याशीं आहे. खरा प्रकार काय आहे ?

**शंखनाद** : हीं पातळं त्या गौरीबाईचींच आहेत. पण–पण मी तुम्हांला सांगितलं हें तुम्ही मामांना सांगूं नका हं ! मी गरीब बिचारा बातमीदार. खऱ्या बातम्या द्यायच्या हें माझं ब्रीद–म्हणूनच तुम्हांला ही बातमी सांगितली. एरवीं—

**मर्मी** : बरं बरं. केव्हां काय थाप मारायची हें चांगलं कळतं मला. मी त्यांचीच बायको आहे.

शंखनाद : ( ओशाळून ) हो का ? अरे खरंच की. ( जातां जातां थांबून ) ममीसाहेब, या प्रकरणावर एखादी मुलाखत देतां कां ?

ममी : चला चालते व्हा. ( तो झटकन निघून जातो. फोन येतो. ममीसाहेब तो घेतात. ) हॅलो ! हरिभाऊ हर्षे ? कुठून बोलताय् ? 'टिमकी'तून ? बरं—काय ? टेलिफोन ऑफिसकडून बिलाचे तगादे येताहेत ? उद्यां बिल मिळालं नाहीं तर आपलं कनेक्शन तोडणार आहेत ? ( घाबरून ) हूं पाहा जराशानं पुन्हां फोन करा. साहेब झोपलेत अजून. [ तोंच आंतून—मामासाहेब—'घनश्याम सुंदरा श्रीधरा'—गात असल्याचं ऐकूं येतं. ममीसाहेब झटकन रिसीव्हर ठेवतात. दिवे मालवून दारंखिडक्या उघडतात. आतां घरांत संपूर्ण उजेड येतो. त्या पार्सल लपवून ठेवतात. मामासाहेब जांभया देत प्रवेश करतात. मामासाहेब वयानं सुमारें ५०. थापा मारणं हेंच यांचं अस्त्र. ]

मामा : ( प्रवेशून ) 'अरुणोदय झाला' – ( ममींना पाहून अपराधी मुद्रेनं गाणं बंद करतात. )

ममी : हरिभाऊ हर्षांचा फोन आला होता. टेलिफोनच्या बिलाचे तगादे येताहेत म्हणे. ( थांबून ) आणि—गौरीबाई गोवेकरांचाहि फोन आला होता.

मामा : ( चमकून ) होय का ? कमाल आहे बुवा तिची. तिला आम्ही मुद्रण—परिषदेसाठीं रशियाला पाठवणार आहोंत ना. त्यासंबंधीं विचारीत असेल ती. ( विषय बदलून ) चहा आणतां ना ? ( त्या जातात. फोन येतो. मामा घेतात. ) हॅलो ! गौरीबाई ? तुमचीं पातळं ! माझ्याकडे ? ( ममीसाहेब चहा घेऊन आल्यामुळं मामासाहेब फोन खालीं ठेवून शोधाशोध करतात. ) काय बाई आहे ! म्हणे रशियाला जातांना पातळं कुठलीं नेसूं ?

ममी : सांगायचं—जॉर्जेटचीं नेसा म्हणून. ( मामा दचकतात. ) कांहीं हरवलंय वाटतं ?

मामा : अं ! हं ! आपल्या 'टिमकी'ची फाइल. ( त्या फाइल देतात. मामा नाइलाजानं ती चाळूं लागतात. )

ममी : ( शांतपणें ) काल रात्रभर छापखान्यांत होतां वाटतं ?

**मामा** : होय ना! दिवाळी अंक जवळ आलाय् ना.

**ममी** : ( त्यांची थाप लक्षांत येऊन ) काल तुम्हीं माझ्यासाठीं पातळं विकत घेतलीं होतीं ?

**मामा** : ( इतका वेळ ठेवलेली कुढी मुद्रा बदलून ) अरे हो! तुम्हांला इतका वेळ सांगायलाच विसरलों. पण झाली काय मजा—कीं मीं तीं कुठं ठेवलीं तेंच मला आठवत नव्हतं.

**ममी** : ( शांतपणें ) टॅक्सींत विसरला होतात. तुमच्या शंखनादानीं मघांशींच आणून दिलींत.

**मामा** : ( ओशाळपणा दडवीत ) होय का ? अरे शंखा. कुठं आहेत ? ( त्या पार्सल देतात. ) छान आहेत नाहीं ?

**ममी** : पांच वारी आहेत तीं.

**मामा** : ( बसत ) होय का ? म्हणजे दुकानदारानं चांगलंच बनवलं म्हणायचं. नऊ वारीचे पैसे घेऊन बेट्यानं पांचवारी पातळं पाठवलीं ! दिवाळी अंकाची वर्गणी घेऊन दैनिक पाठवलं लेकानं ! तें कांहीं नाहीं. उद्यांच्या माझ्या टिमकींत—व्यापाऱ्यांच्या सचोटीचा बेन्डबाजा—या विषया-वर अग्र-लेखच लिहितों. [ पोस्टमन—मालवणकर—असं पुकारून बाहेरच्या पेटींत टपाल टाकतो. मामासाहेब तें घेऊन येतात. आणि ममीसाहेबांच्या नांवचं एक पाकीट त्यांच्या हातांत देतात. ]

**ममी** : ( वाचून—आनंदानं ) अग बाई ! आजच्या एक्सप्रेसनं आपली नूतन येतीय् !

**मामा** : ( आनंदानं ) नूतन येणार—वा वा—आज सकाळीं कोणाचं तोंड पाह्यलं होतं कोणास ठाऊक ? ( ममीसाहेबांकडे पाहतात. आणि त्यांचंच तोंड पाह्यलं होतं—हें उमगून मान खालीं घालतात. )

**ममी** : तुमचं आपलं कांहीं तरीच ! कुणी ऐकलं तर काय म्हणतील ?

**मामा** : मग ? स्वतःच्या मुलीचं कौतुक करणाऱ्या बापाला कुणाच्याहि बापाची भीति असूं नये. त्यांतून या मुली लग्नापूर्वी मायेनं आईच्या गळ्याला मिठी मारतात तर लग्नानंतर प्रेमानं नवऱ्याच्या गळ्यांत पडतात. म्हणजे बाप आपला रिकामा तो रिकामाच. म्हणजे—मुलीला उजवायला जोडे फाडायचे बापानं आणि ती उजवली गेल्यावर रडायचंहि

बापानंच ! छे छे—गडकरी म्हणतात तें खोटं नाहीं—मुलीचा बाप होण्या-परतं पाप नाहीं जगांत.

**मम्मी :** आज काय तो कण्वमुनि संचारलाय् काय तुमच्या अंगांत ?

**मामा :** तो कण्व लेकाचा ढोंगी असला पाहिजे. पाळलेली मुलगी सासरीं धाडण्याच्या दुःखापेक्षां पोटची मुलगी घरीं येण्याचा आनंदच मनाला अधिक बेचैन करतो, याची त्याला काय कल्पना असणार ? खरंच, आपण नूतनला मुळीं इतकं दूर ठेवायलाच नको होतं.

**मम्मी :** तुमचं आपलं कांहीं तरीच ! तिला नृत्याची आवड होती म्हणूनच नाहीं का तिला आपण अलमोड्याला ठेवली. आणि मग उद्यां तिचं लग्न झाल्यावर—

**मामा :** हं ! नूतन कायमची सासरीं गेल्यावर आपलं काय होईल देव जाणें.

**मम्मी :** मी इकडे आल्यावर माझ्या वडिलांचं काय झालं ? आणि इतकी तुमची मुलीवर माया असेल तर एखादा घरजांवईच पाहा.

**मामा :** छान ! तुमचं आमचं इतर कशांत जमलं नाहीं तरी या बाबतींत एकमत झालेलं पाहून मला आनंद वाटला. आतां तुम्हांला सांगायला हरकत नाहीं. नूतनसाठीं एक झकाससा घरजांवई मीं हेरूनहि ठेवलाय्. पण आधीं तुमच्या जांवयाबद्दल काय कल्पना आहेत तें सांगा पाहूं.

**मम्मी :** सांगूं ? तो दिसायला सुंदर हवा.—

**मामा :** झालं—प्रथमच घसरलांत—स्त्रियांचं सामर्थ्य सौंदर्यांत तर पुरुषांचं सौंदर्य त्यांच्या सामर्थ्यांत असतं—असं चक्क आचार्य अत्र्यांनींच म्हणून ठेवलंय्.

**मम्मी :** हो—असं असतं तर जगांतले सारे पहेलवान न् फ्रीस्टाइल कुस्तीगीर यांचीं स्थळं सर्वोत्कृष्ट ठरलीं असतीं. तसंच नूतनच्या आवडीनिवडी त्याच त्याच्या आवडीनिवडी असल्या पाहिजेत.

**मामा :** हा गौण मुद्दा आहे. लग्न झाल्यानंतर दोघांच्या आवडीनिवडी इतक्या जुळतात कीं त्यापुढं त्यांना आईबापांचीहि आठवण येत नाहीं. पुढं बोला—

**मम्मी :** मुख्य म्हणजे आपली नूतन कलेची भोक्ति असल्यामुळें एखादा कलावंत जांवई मिळाला तर सोन्याहून पिवळं !

**मामा :** छान् ! अहो कलावंतांचें जीवन म्हणजे मृगजळ. दुरून दिसायला पाणी, पण जवळ गेल्यावर कोरडें ठणठणीत. या बाबतींत माझं धोरण फार दूरचं आहे. तुम्हांला माहीतच आहे कीं—आमच्या दैनिक 'टिमकी'चा खप दिवसेंदिवस रोडावत चालला आहे. लोकांचे पगार—टेलिफोनची बिलं थकलीं आहेत. छापखाना गहाण पडलाय्. तेव्हां या साऱ्या कटकटींतून बाहेर पडायचं तर सध्यां आपल्याला पैसेवाल्या—श्रीमंत जांवयाची जरूर आहे. मीं पाहिलेला जांवई पैसेवाला आहे. तुमच्या माहितींतला आहे. ओळखा बरं कोण असेल तो ?

**ममी :** असेल एखादा किराणा आणि भुसार मालाचा व्यापारी.

**मामा :** चूक—एकदम चूक. ज्याला परवांच्या कोड्यांत २३००० हजार रुपयांचं बक्षीस मिळालं तो माझा सहसंपादक-राजमान्य राजेश्री हरिभाऊ हर्षे.

**ममी :** तें ध्यान ? छान् ! शिवाय संपादकाच्या संसाराचे धिंडवडे मी प्रत्यक्ष अनुभवीत असतांना माझ्याच मुलीला सहसंपादकाच्या गळ्यांत बांधायची म्हणजे तिच्या गळ्यांत झोळीच अडकवावी लागेल.

**मामा :** तें कांहीं नाहीं. आपली नूतन त्याच्या गळ्यांत बांधायची आणि त्याच्या पैशांतनं आपल्या छापखान्याचा गळा सोडवायचा. २ दुणे ४ इतका सरळ हिशोब आहे हा. आतां नूतन आली कीं—( बाहेर मोटारचा हॉर्न वाजतो. ममीसाहेब खिडकींतून पाहतात. त्यांना नूतन आलेली दिसते. )

**ममी :** अगबाई ! नूतनच आली.

**मामा :** ( उठून ) म्हणजे ? आजची एक्सप्रेस ४ तास लवकर आली कीं कालची एक्सप्रेस २० तास लेट आली ?

**ममी :** कुणाच्या तरी मोटारींतनं आलीय् स्वारी—

**मामा :** मोटारींतून ? कोणाच्या ?

**ममी :** ( लाडानं ) नू—त—न

**नूतन :** ( बाहेरूनच ) म—मी—आ—लें—

**ममी :** पाहिलंत. मला किती प्रेमानं हांक मारली तिनं. तिचं माझ्यावरच जास्त प्रेम आहे.

**मामा :** तो वादाचा मुद्दा आहे. लावा पैज. आल्याबरोबर ती जर माझ्या पायां पडली तर तिचं माझ्यावर जास्त प्रेम आहे. जर ती एकदम येऊन

तुमच्या गळयांत पडली तर –[ नूतन येऊन थेट आईला मिठी मारते. नूतन वय वर्षे १८–सुंदर–मामा, ममी एकमेकांकडे पाहतात. ]

**ममी** : पाहिलंत का हो ?

**मामा** : नूतन, मला वाटतं तूं ५० पर्सेंट माझीहि आहेस.

**नूतन** : ( प्रेमानं मामांच्या गळयाला मिठी मारून ) पपा—

**मामा** : अहो–तुमचं आपलं कांहींतरीच–बघा. नूतन, किती वाळली आहेस तूं ?

**नूतन** : वाळलीय् ? मास्टरजी तर म्हणतात, वाढलीय्.

**मामा** : ( दूर होऊन ) मास्टरजी कोण ?

**नूतन** : माय गॉड ! विसरलेंच कीं मी. (प्रवेशद्वारांतून) मास्टरजी, तिकडून वर या. पण थांबा मीच आलें. ( नाचत नाचत जाते. क्षणभर मामा-ममी थक्कच होतात. तोंच बेल वाजते. मामा फोन घेतात. )

**मामा** : हॅलो–? टेलिफोन ऑफीस ? उद्यांचे उद्यांच बिल पाहिजे ? आणखी थोडे दिवस थांबा हो. या दिवाळीला नक्की देतों. अं ? कनेक्शन तोडणार ? उद्यांच ? [ फोन खालीं ठेवणार तोंच हंसत खिदळत नूतन व नीतिन येतात. नीतिन–नेहरू शर्ट–बंगाली पद्धतीचा सोगा अशा वेशभूषेंत असतात. दिसायला इतके सुंदर कीं त्यांच्यांत बायकी झाकच अधिक मारते. प्रत्येक शब्द नृत्याभिनयांत बोलण्याची यांना खोड असते. ]

**नूतन** : ममी–पपा–यांची ओळख करून देतें. हे नीतिन बाबू.

**मामा** : ( किंचित् रोषानं ) हे बंगाली आहेत वाटतं ?

**नीतिन** : नाहीं–माझी आई बंगालमधली होती.

**मामा** : आणि तीर्थरूप ?

**नीतिन** : इकडलेच. महाराष्ट्रीय होते. माझा जन्म बंगाल्यांतला–म्हणून माझं बंगाली पद्धतीचं नांव ठेवलं.

**मामा** : अच्छा ! असं गौडबंगाल आहे होय ?

**ममी** : तुमचं आपलं कांहींतरीच. ( प्रेमानं नीतिनला ) बसा ना ! ( सर्वजण बसतात. ) आपण काय करतां ?

**नूतन** : हे प्रख्यात नर्तक आहेत.

**मामा** : ( उठून ) कोण !

नीतिन : नर्तक. कथकली–कथ्थक–मणीपुरी–भारतनाटयम्—

नूतन : या सर्व नृत्यकलांचे हे मास्टर आहेत. म्हणून आमच्या अलमोड्याचे विद्यार्थी – विद्यार्थिनी यांना मास्टरजीच म्हणतात. दिल्लीलाहि यांचें एक डान्सिंग स्कूल आहे. सिमल्याला त्या स्कूलची एक शॉखाहि आहे. हे स्वतः कोचीन–आलेप्पी मलबारमधून गोपीनाथांकडून नृत्य शिकून आले आहेत. उदयशंकरांनींहि यांना कांहीं दिवस आपल्याकडे ठेवून घेतलं होतं. त्यांच्याबरोबर हे चीन–जपान–इंग्लंड–अमेरिका–रशिया–

मामा : बस ! बस ! बस !—एकूण या मास्टरजींची कला म्हणजे यूनोची कचेरीच आहे म्हणेनास. ( एकदम ) हें सगळं ठीक आहे. पण काय हो मास्टरजी ? आपल्याला महिना पगार किती मिळतो ? आणि महिन्याच्या महिन्याला तो नक्की मिळतो किंवा कसं ?

नूतन : छे–छे, ते विनामूल्य काम करतात. ' कलेवर अर्थोत्पादन करणं म्हणजे शुद्ध व्यभिचार आहे ' असं यांचं मत आहे.

मामा : पण अर्थोत्पादनाच्या व्यभिचाराशिवाय जगांत पोट भरत नाहीं, असं माझं मत आहे—यावर आपलं काय मत आहे ?

ममी : तुमचं आपलं कांहींतरीच. ही काय संपादक – परिषद् आहे वाटतं ! म्हणे माझं मत अचंच आहे आणि तुमचं मत कचं आहे ! मास्तरजी, माझी ओळख मीच करून देतें. मी हिची आई—

नीतिन : माताजी ! आश्चर्य आहे.

मामा : आश्चर्य नाहीं—खरोखरीच ही हिची आई आहे.

नीतिन : माफ करा. मला तुम्ही नूतनची बडी दीदी वाटलांत.

ममी : ( लाजून ) तुमचं आपलं कांहींतरीच.

नीतिन : खरंच ! नूतनची बडी दीदी समजून पुढंमागं तुम्हांला अलमोड्याला डान्स शिकवायलाहि नेणार होतों मी.

मामा : ( ओरडून ) काय ? [ मास्टरजी चमकतात. ]

नूतन : हे माझे वडील.

मामा : मामा मालवणकर माझं नांव. मी तरी तिचा बाप वाटतोय् का ? हो, नाहींतर तुम्ही मला हिचे भाऊ समजलांत तर काय घ्या.

**नीतिन :** वा–वा ! तुमचे हे पिकलेले केस पाहिल्यावर—

**मामा :** मास्टरजी–ही बुद्धीची खूण आहे. शिवाय या पिकल्या पानांत–जाऊं द्या. तुम्हांला काय सांगायचं ? तुमच्या बुद्धीची टांचणीच चुकली असावी. त्यांतून तुम्ही नाचे—

**ममी :** नाचे नाहीं नर्तक–

**मामा :** एकच ! नाचा काय अन् नर्तक काय. कुणी अग्रलेख म्हणतं अन् कुणी संपादकीय म्हणतं.

**नीतिन :** मामासाहेब, तुम्ही विनोदी दिसतां बुवा.

**मामा :** विनोदी दिसतो बुवा ! नशीब– मी विदूषक दिसतों नाहीं म्हणालांत.

**नीतिन :** माफ करा. पण नूतनप्रमाणेंच तुम्ही दोघंहि खेळीमेळीनं वागणारे आहांत हें पाहून आनंद वाटला मला. तुमची नूतन म्हणजे एक रत्न आहे. तिला मी भारताची मादाम पाव्हालोव्हा करीन तरच गुरूचं नांव सांगेन.

**नूतन :** पुरे हं. तुमची साखरपेरी जुबान माझ्या चांगल्या परिचयाची आहे. ममी-पपा–मी यांच्याच मोटारींतून मुंबईहून इथें आलें. यांना थँकस् द्या.

**नीतिन :** नो–नो– मीं माझं कर्तव्य केलं. तुमच्याकरितां मी काय करणार नाहीं ? तुम्हांला मोटारींतून पुण्यालाच काय, पण विमानांतून साऱ्या जगभर फिरवीन मी.

**ममी :** छान ! –मीहि येईन तुमच्याबरोबर. मलाहि केव्हां केव्हां जग पाहावंसं वाटतं.

**मामा :** मला वाटतं तुम्हां साऱ्यांचीं विमानं फारच वर जायला लागलीं आहेत. आणि मला तर त्या कल्पनेनंच हुडहुडी भरायची वेळ आली आहे. तेव्हां आपण आधीं गरमागरम चहा घेऊं या आणि मग—

**नीतिन :** नो–नो– थँकस्. आत्तां कोरेगांव–पार्कमधल्या एका संस्थानिकाशीं माझी अपॉइन्टमेन्ट आहे. तो माझ्या डान्सिंग बॅलेच्या वर्ल्ड टूरला फिनान्स देणार आहे. शिवाय मी राह्यलाहि कॅम्पांतल्या नॅशनल– हॉटेल–

मध्यें जाणार आहें. खोली बुक करून ठेवली आहे. शिवाय आज रात्रींच मला परतावं लागणार आहे.

नूतन : हं-- आम्ही तुम्हांला लवकर सोडणार नाहीं हं.

मामा : वा वा ! असं म्हणून कुठं भागतंय ? हे नाचे-नाहीं नर्तक-यांचीं पावलं फार वेळ एका जागीं ठरणं कठीणच. त्यांना राहायला आग्रह करायचा म्हणजे त्यांचीं घुंगरं काढून घेण्यासारखंच आहे.

ममी : तें कांहीं नाहीं हो. तुम्ही चांगले चार दिवस रहा— आणि रहाल ते आमच्या घरींच रहा. आणि वेळ मिळेल तेव्हां आम्हांला नाचूनहि दाखवा. शिवाय खानावळींतल्या अन्नाला घरची का चव येणार आहे ?

मामा : पण त्यांना घरच्या अन्नापेक्षां खानावळीच्या अन्नाची अधिक संवय असेल तर ? तें कांहीं नाहीं. मास्तरजी, तुम्ही काय लागतां या बायकांच्या नादीं ? तुम्हीं खोली बुक केलीय् ना ? मग तुम्ही तिकडेच जा. अहो, आम्हांला परवानगी नाहीं म्हणून-नाहीं तर आम्हांलासुद्धां खानावळच बरी वाटते.

नीतिन : तरी पण माझ्या प्रिय शिष्येचा आग्रह मोडून घरच्या अन्नाला लाथ मारणं बरं नव्हे.

ममी : थँक्यू-चला-तुम्हांला खोली दाखावितें.

मामा : मी दाखवूं का ?

ममी : कांहीं नको. तुमचं एवढं प्रेमाचं कन्यारत्न फारा दिवसांनीं घरीं आलंय् तर तुम्हीं त्याच्याशींच बोलत बसा. ( दोघं माडीवर जातात. )

नूतन : ( पाहून ) किती सुंदर आहेत नाहीं !

मामा : ( रागानं ) अं ? हा बायकी पुरुष सुंदर ?

नूतन : मग आहेच मुळीं. तुम्हीं नुसतीं दैनिकच काढीत बसावं-सौंदर्याचा आस्वाद घेणं तुम्हांला कसं जमणार ! कला— कलेचं सौंदर्य— कलावंतांची दुनिया-तुम्हांला ऐकून सुद्धां ठाऊक नसेल. सारे नर्तक वागणुकीनं असेच बायकी असतात. पण नर्तकांच्या बायकीपणांतच केवढं पौरुषत्व सांठवलेलं असतं याची कल्पना त्यांचा गंडा बांधणारालाच येते.

मामा : ( रागावून ) तूं या नाच्याचा गंडा बांधला आहेस काय ?

नूतन : ऑफ कोर्स. त्यांनींच माझ्या हातांत गंडा आणि पायांत घुंगरू बांधलीं आहेत.

मामा : मूर्ख आहेस—गंडा बांधणं हा वाक्प्रचार—गंडा घालणं या प्रकारांतूनच उत्पन्न झाला आहे. शिष्येला गंडा बांधणारे बहुतेक गुरु तिच्या गळ्यांत मंगळसूत्र बांधण्याकरितां टपलेले असतात.

नूतन : मग तर फारच छान. कारण—करीन तर एखाद्या कलावंताशींच लग्न करीन—असा माझा निश्चय आहे. मोठमोठ्या वृत्तपत्रांतून—मोठमोठ्या मथळ्यांनीं ज्याचं नांव छापून येतं असाच एखादा कलावंत मी जीवनाचा साथीदार निवडणार आहें. ज्या कलावंतावर हजारों स्त्रियांनीं प्रेम केलं असेल अशाचीच आपण प्रेयसी नव्हे पत्नी व्हावं—असं कोणत्या मुलीला वाटणार नाहीं ?

मामा : बस् कर. [ मम्मी येतात. ] परपुरुषाबरोबर ८०० मैल आगगाडींतून आणि १५० मैल मोटारींतून प्रवास करतेस काय आणि—

मम्मी : तें तुम्ही तिला सांगतां ?

मामा : या.

नूतन : पपा—तुम्ही किती मागं आहांत जगाच्या.

मम्मी : मागं ? ते किती पुढें गेले आहेत तें त्यांना ठाऊक कीं मला ठाऊक.

मामा : म्हणजे आतां कहर झाला. ही जशी एका पर—पुरुषाबरोबर मोटारींतून बसून आली तशी मी उद्यां एखाद्या परस्त्रीबरोबर मोटारींत बसून गेलों तर—

मम्मी : तर काय ? बोला ना ?

मामा : ( चपापून ) जाऊं द्या झालं. बायकांच्या तोंडीं लागणारा तो आदिपुरुष आदमाहि मूर्ख ठरला तिथं आमचा काय पाड ! नूतन—मला तुझ्याकडून स्पष्ट, एकदांच— आणि शेवटचा खुलासा हवा आहे. हा कोण मास्टरजी का फास्टरजी आणला आहेस त्याच्यावर तुझं प्रेमबिम आहे काय !

मम्मी : एखाद्या बाईबरोबर फिरणाऱ्या पुरुषाचं त्या बाईवर प्रेमच असतं काय ?

मामा : अहो—तुमचं आपलं कांहींतरीच—तुमच्या तोंडाचं रोटरी मशीन थोडा वेळ बंद ठेवाल का !

**नूतन** : पपा–ते फक्त माझे गुरु आहेत, एवढेंच. त्यांची आंतरराष्ट्रीय कीर्ति मला मोह पाडते. त्यांच्या पायांतल्या सौंदर्यावर मी खिळून राहतें. त्यांच्यावर आजपर्यंत हजारों स्त्रियांनीं प्रेम केलंय् म्हणूनच त्यांचा सहवास मला हवाहवासा वाटतो. याला कुणी प्रेमहि म्हणेल. पण जगाची उत्पत्ति प्रेमांत–स्थिति प्रेमांत–आणि लयहि प्रेमांतच आहे–[ स्वयंपाकघरांत जाते ]

**मामा** : ऐका–ममीसाहेब, आपल्या प्रेमाच्या या संयुक्त महाराष्ट्राचा हा जाहीरनामा ऐका. ज्या पुरुषांनीं हजारों पाकस्त्रिया पचविल्या आहेत असा तो मास्टरजी म्हणे आमच्या कन्यारत्नाला आवडतो. अरे काय मुलगी आहे का वर्तमानपत्राचा एजंट आहे ?

**ममी** : तुमचं आपलं कांहींतरीच. काय वाईट आहे हो तो ? दिसतो किती सुंदर–बोलतो किती मिठ्ठास–वागतो कसा मोहक. नूतननीं त्याची निवड केली तर मला मुळींच वाईट वाटणार नाहीं.

**मामा** : छान ! आमच्या मुलीच्या मातोश्री शोभता खऱ्या. खरोखर आमच्या मुलीनं अलमोड्यांत प्रेमाच्या पताका फडकावून–अटकेवर झेंडा फडकवणाऱ्या राघोबादादा पेशव्यावरहि ताण केली म्हणायची. तें कांहीं नाहीं. आपल्या नूतनच्या या वेडावर राजमान्य राजश्री हरिभाऊ हर्षे हाच एक रामबाण उपाय आहे. आमच्या टेलिफोनचं कनेक्शन तोडणं अथवा न तोडणं आतां फक्त त्यांच्याच हातांत आहे. 'टिमकीं'त शब्दकोडीं घालून पाहिलीं, अश्लील लेख– चित्रं छापून पाहिलीं; निरनिगळे वाद खेळून पाहिले–पक्ष बदलून पाहिले–मासिक भविष्यं देऊन पाहिलीं. पाडव्या-पासून ते शिमग्यापर्यंत खास अंक काढून पाहिले. पण तरीहि आमच्या 'टिमकी'चा आवाज आमच्या गल्लीबाहेरहि जाऊं शकला नाहीं. हातीं छापखाना होता म्हणून दैनिक काढलं. तर दैनिक काढलं म्हणून आतां दिवाळं काढायची वेळ आलीय्.

**ममी** : झालं तुमचं बोलून ? का राहिलाय् आणखी कांहीं स्टॉपप्रेस ? नीट ऐका. प्राण गेला तरी माझी मुलगी त्या हर्षांच्या गळ्यांत बांधूं देणार नाहीं मी.

**मामा** : आणि प्राण गेला तरी मी लिहून ठेवीन कीं–चि. सौ. कां. नूतन सौ. हरिभाऊ हर्षेच झाली पाहिजे. आणि मग एका सहसंपादकाचा घरजांवई

कसा झाला, ही लेखमाला दैनिक 'टिमकी'तून तुम्हांला वाचायला लावीन तरच नांवाचा मामासाहेब मालवणकर. एका सहसंपादकाच्या गळ्यांत फुकटांत मुलगी आणि कर्जासकट छापखाना बांधण्याची करामत–'याची देहीं–याची डोळां' करून दाखवीन तरच नांवाचा संपादक.

**मर्मी :** हो–तुमच्या हातांत माझ्या मुलीचं भवितव्य सोंपवायला मी कांहीं कच्च्या नवऱ्याची बायको नाहीं. काय तें हर्षाचं ध्यान.

**मामा :** अहो, लग्नाच्या निवडणुकींत स्त्रीउमेदवाराची निशाणी सौंदर्य ही असते, तर पुरुष उमेदवाराची निशाणी कर्तृत्व ही असते. आतां स्पष्टच बोलायचं म्हणजे तुम्हीं आमचं कुटुंब झालांत तें काय आमचं रूप पाहून ! आणि आम्ही आपल्याशीं शरीरसंबंध जोडला तो काय आपली अक्कल पाहून ? तसं म्हणाल तर जगांत रूप आणि कर्तृत्व यांचं त्रैराशिक व्यस्तच असतं.

**मर्मी :** आपलं झालं तें झालं– आतां काय त्याचं. एकदां छापलेल्या बातमीप्रमाणं एकदां केलेलं लग्न मोडतां येत नाहीं म्हणून–नाहींतर—

**मामा :** कां ? चुकांच्या दुरुस्त्या करून दिलगिऱ्या प्रदर्शित करणं हें तर आमच्या पांचवीलाच पुजलेलं असतं कीं.

**मर्मी :** हो – पण लग्नाच्या चुकीची दुरुस्ती करण्याइतकं नैतिक धैर्य आम्हां बायकांत नसतं म्हणून तर तुम्ही पुरुष चुकांचीं दैनिकं काढीत सुटतां. त्यांतून माझी नूतन म्हणजे कांहीं एखादी सार्वजनिक भिंत नाहीं, कीं कोणीहि यावं आन् तिच्यावर नवरेशाहीचं पोस्टर चिकटवून जावं. तुमच्या त्या हर्षाशीं आपली नूतनच काय, पण तुमच्या छापखान्यांतली एखादी झाडुवालीसुद्धां लग्न करणार नाहीं. आयुष्यांत आपलं लग्न झालं एवढाच हर्ष त्या हर्षाला मिळवायचा असेल तर आमच्या परसांतलं रुइचं झाड अजून लग्नाचं आहे म्हणावं. [ हरिभाऊ येतात. ] खुशाल जाऊन लग्न लावा —

**हरिभाऊ :** ( मामांस ) आपण दुसऱ्या लग्नाच्या विचारांत आहांत काय ? [ आणि मामामर्मींचा वाद एकदमच थंड पडतो. हरिभाऊंच्या आडनांवांतच फक्त हर्ष असून एरवीं हर्षाचा आणि त्यांचा सुतरामहि संबंध नसावा असं त्यांच्या भकास मुद्रेवरून वाटतं. डोक्याला घडीची काळी टोपी— ओठावर कशातरी वाढलेल्या मिशा—बिन कॉलरचा सदरा– तयार कपडे–

वाल्याकडून आणतांना मापाचा आणलेला पण नंतर आटलेला कोट—सूत्रधारासारखं धोतर आणि पायांत कोल्हापुरी वहाणा हा यांचा थाट. थोडक्यांत ते साक्षात् सहसंपादकच दिसतात. ]

**मामा :** या — हरिभाऊ हर्षे — आम्ही दुसऱ्या लग्नाच्या विचारांत नसून दुसऱ्याच्या लग्नाच्या विचारांत आहोंत. आधीं मला हें सांगा कीं, तुमचा २३००० रु. चा चेक आला कीं नाहीं ?

**हरिभाऊ :** हीं प्रुफं तपासायला आणलीं आहेत. निम्मा अंक मशिनवरच चढवून आलों आहे, आणि हे फोटो आले आहेत ब्लॉकसाठीं. मामासाहेब, आपण रात्रीं छापखान्यांत आलां नाहींत म्हणून—

**मामा :** बरं, बरं [ मामासाहेब त्याला गप्प करतात. प्रुफं तपासण्यांत गर्क होतात. रात्रींची थाप लक्षांत येऊन ममीसाहेब स्वयंपाकघरांत जातात. ]

**हरिभाऊ :** मी मधेंच आलों म्हणून तर ममीसाहेब रागावून आंत नाहीं ना गेल्या !

**मामा :** अं ! हं ! अंहं ?

**हरिभाऊ :** मामासाहेब, आपण मोटार घेतलीत वाटतं ?

**मामा :** नाहीं. आमची नूतन आली आहे. तिच्याबरोबर तिचा गुरु आला आहे. त्याची आहे ती गाडी.

**हरिभाऊ :** हो का ? त्या आल्या आहेत का ?

**मामा :** हर्षे—हें सहसंपादकाचं जिणं किती दिवस जगायचा विचार आहे तुमचा ?

**हरिभाऊ :** तुम्ही आहांत तितके दिवस.

**मामा :** म्हणजे ?

**हरिभाऊ :** नाहीं म्हणजे तुम्ही ठेवाल तितके दिवस.

**मामा :** पण आपण मोठं व्हावं—इतकं मोठं कीं, एक दिवस मामा मालवणकराची खुर्ची घ्यावी—असा विचार तुमच्या मनांत कधीं आला नाहीं.

**हरिभाऊ :** छे ! छे ! दुसऱ्याच्या वस्तूवर डोळा ठेवणं बरं नव्हे.

**मामा :** अहो, माझी खुर्ची म्हणजे माझे अधिकार. संपादक व्हावं असं तुम्हांला कधीं वाटलं नाहीं !

**हरिभाऊ :** वाटलं. स्वप्नांत अनेकदां वाटलं.

मामा : मग नीट ऐका. पुढच्याच महिन्यापासून मी तुम्हांला संपादक करणार आहे. ( तो आनंदानं उठतो. ) आणि घरजांवईसुद्धां ! ( निराशेनें तो खालीं बसतो. ) कांहो, संपादकाच्या खुर्चीपेक्षां माझी मुलगी वाईट आहे काय ?

हरिभाऊ : साहेब, सरकारनं दोनदां आपलं डिपॉझिट जप्त केलं तरी अजून तुमचा विनोदी स्वभाव कांहीं जात नाहीं. मी तुमच्या मुलीशीं लग्न करणं म्हणजे माझं डिपॉझिटच जप्त करून घेण्यासारखं आहे. तुमची मुलगी म्हणजे जणुं काय दलालांचं सुंदर तिरंगी चित्र आहे, तर मी शाई जास्त झाल्यामुळं काळाकुट्ट उठलेला ब्लॉक आहे. कुठं त्या अन् कुठं मी ! शिवाय 'स्त्री हा एक पुरुषाची जामीनकी रद्द करणारा लेख आहे' असं परवांच कुठंसं मीं वाचलं आहे.

मामा : कुठल्या गाढवानं लिहिलंय् असं ?

हरिभाऊ : मला वाटतं आपणच गेल्या अग्रलेखांत लिहिलं होतं.

मामा : ( ओशाळून ) अहो पण 'नवविवाहिताला संसार ही एक सरकारी जाहिरात आहे' या वाक्यानींच मीं त्या लेखाचा शेवट केला होता.

हरिभाऊ : हो का ! मग माफ करा. शेवटपर्यंत तो अग्रलेख मीं वाचला नव्हता.

मामा : कां ?

हरिभाऊ : मधेंच मला झोंप लागली होती. अग्रलेख वाचले कीं नेहमींच मला शांत झोंप लागते.

मामा : छान ! हें तुमच्या अन्नदात्याबद्दलचं तुमचं मत. आनंद आहे. हर्षे, मग तुम्ही माझं ऐकाच. तुम्ही एकदां लग्न करा म्हणजे जामीनकी–अग्रलेख –झोंप यांचे विचार चटकन् तुमच्या डोक्यांतून निघून जातील.

हरिभाऊ–मुळींच नको–रोटरी माशिनच्या धडधडाटाप्रमाणें–कलकलाटानें भरलेलं तें– पोरट्यांचं खुराडं–६–६ महिने पगार न मिळाल्यामुळें कंपॉझिट-रच्या काळवंडलेल्या चेहेऱ्याप्रमाणं तो भकास संसार–वृत्तपत्रांप्रमाणें देहाची रद्दी करून चुलीपुढं बसलेली ती बायको– दरवर्षी निघणाऱ्या दिवाळी अंकाप्रमाणें दरवर्षी हलणारे ते पाळणे—

मामा : बस बस बस ! हरिभाऊ हर्षे—एखाद्या सहसंपादकाच्या गळ्यांत सहधर्मचारिणी अडकवणं हें मांजराच्या गळ्यांत घाट अडकवण्याइतकं अवघड असेल याची मला कल्पना नव्हती.

हरिभाऊ : मामासाहेब— पण एक मात्र खरं अं. केव्हां केव्हां अगदीं एकटं बसलं, एखादा इंग्लिश सिनेमा पाहिला किंवा रस्त्यानं जातांना एखादं जोडपं पाहिलं कीं कधीं कधीं मला सुद्धां वाटतं हं—

मामा : अहो, तेंच तें. आमच्या लग्नापूर्वीं आम्हांलाहि अगदीं थेट असंच वाटायचं. आतां अगदीं बोलूंच नका. माझ्या मनाप्रमाणं वागायला तयार व्हा, कीं आठ दिवसांत तुमच्या दोन हातांचे चार हात नाहीं केले तर नांवाचा मामासाहेब मालवणकरच नव्हे. प्रथम तुमचं संपूर्णपणें वेषांतर करायला हवं. तुमच्या ह्या टोपीला आधीं रजा द्या. टोप्या घालणारे पुरुष बायकाना आवडत नाहींत. तशाच तुमच्या ह्या मिशा सेन्सॉर करा. हे तुमचे कपडे बदलून उद्यापासून एकदम अप-टु-डेट पोषाखांत राहा. थोडक्यांत तुमच्या ह्या दैनिकाचा उद्यांच्या उद्यां दिवाळी अंक करून टाका.

हरिभाऊ : बाप रे—मामासाहेब— एक लग्न करायला काय हो हा जामानिमा ? पण इतका जामानिमा न करणारांचींहि जगांत लग्नं होतातच कीं.

मामा : होतात. पण मग त्यांना बायकाहि तशाच मिळतात.

हरिभाऊ : नाहीं नाहीं— आपल्याला करून करायची तर मग जरा सुंदरच बायको करावी म्हणतों.

मामा : शाबास— जीते रहो पठ्ठे ! नुसत्या लग्नाच्या कल्पनेनंच तुमच्यांत इतकी क्रांति झाली तर प्रत्यक्ष लग्न झाल्यावर तर तुम्ही क्रान्तिकारकाचे बाप व्हाल.

हरिभाऊ : पण मामासाहेब, तीं प्रुफं छापखान्यांत पोहोंचवायचीं आहेत. निम्मा अंक मशिनवरच चढवून आलों आहे. शिवाय या फोटोंचे ब्लॉक्स करायचे राहिलेत अजून.

मामा : प्रुफं गेलीं जहन्नममध्यें अन् फोटो घाला चुलींत. आधीं लगीन तुमचं अन् मग माझ्या दैनिकाचं. आतां नूतन येईल. ती आल्यावर पहिल्या फटक्याला तुम्ही तिला काय म्हणाल ?

हरिभाऊ : आपली तब्बेत कशी काय आहे ?

मामा : मूर्ख आहांत. स्त्रीच्या तब्बेतीची चौकशी करणाऱ्या पुरुषांपेक्षां तिच्या रूपाची स्तुति करणारा पुरुषच तिला अधिक आवडतो. शिवाय ' स्त्रियांच्या तब्बेती मुळांत ठणठणीतच असतात ' हें मुळीं पुरुषांनीं गृहीतच धरून चालायचं असतं. मग तुम्ही प्रथम काय म्हणाल !

हरिभाऊ : तुम्ही खूप सुंदर आहांत.

मामा : अहो, मला नव्हे. माझ्या मुलीला असं म्हणा.

हरिभाऊ : मुलीलाच कीं. तुम्हाला सुंदर म्हणणारा मनुष्य एक आंधळा तरी असला पाहिजे किंवा पोटार्थी सहसंपादक तरी असला पाहिजे.

मामा : व्हाल ! लवकर तयार व्हाल ! आणखी काय म्हणाल ?

हरिभाऊ : तुमच्याशीं माझं लग्न झालं तर आपला जोडा अगदीं लक्ष्मी-नारायणाच्या तोंडांत मारण्यासारखा शोभून दिसेल ! ( वरून गुच्छ घेऊन आलेला नीतिन हें ऐकतो. )

नीतिन : ( आश्चर्यानें ) काय हो हें ?

मामा : ( ओशाळून ) कांहीं नाहीं. छापखान्याच्या वाढदिवसानिमित्त होणाऱ्या नाटकाची आम्ही तालीम करीत होतों.

नीतिन : त्यांत हे हिरॉइनची भूमिका करणार आहेत वाटतं ?

हरिभाऊ : तुमचे डोळे फुटलेत वाटतं ? मेहेरबान, या जन्मांत तरी मी नायिकेची भूमिका करणं शक्य आहे का ? मी हिरोची भूमिका करणार असून यांची मुलगी—

मामा : हर्षे—आपल्या नाटकाचा सस्पेन्स आतांच घालवूं नका.

नीतिन : ( साशंकतेनें ) नूतन कुठं आहे ? तिला हा गुच्छ द्यायचाय्.

मामा : आणा, मी देतों. ती आंघोळ करतीय्. ( निराशेनें तो गुच्छ देतो व वर जातो. )

हरिभाऊ : ( रागानं ) कोण हो हा ?

मामा : हाच तुमचा प्रतिस्पर्धी. नर्तक आहे म्हणे—नर्तक कसचा नाचा आहे झालं. माझ्या मुलीला म्हणे हा आवडतो. आमच्या कुटुंबालाहि म्हणे तो बऱ्यापैकीं वाटतो. पण याच्यामागं जन्मभर माझ्या मुलीला नाचायला लावून तिच्या संसाराची नृत्यशाळा करायची नाहीं आहे मला. त्यापेक्षां तुम्ही कितीतरी चांगले आहांत. तुमच्याजवळ पैसा आहे. तुम्ही मनांत

आणाल तर माझ्या छापखान्यासकट तुम्ही मला विकत घ्याल. तुम्ही मनांत आणाल तरच माझी पोरगी ह्या नाच्याच्या तावडींतून सुटणार आहे.

**हरिभाऊ :** मग आणाच—आणाच तुमच्या मुलीला. आतांच्या आतां तिच्याशीं लग्नच लावून टाकतों. अहो, सहसंपादकाच्या लेखण्या आधीं खवळायच्या नाहींत आणि एकदां का त्या खवळल्या कीं, त्या डिपॉझिट जप्त होण्याचाहि विचार करीत नाहींत.

**मामा :** शाबास ! तिची एक ग्यानबाची मेख तुम्हांला सांगून ठेवतों. ती विचारील तुमच्या अंगांत एखादी कला आहे का ? तर दडपून सांगा—मला गातां येतें—लाहोरच्या कव्वालखांचा मीं गंडा बांधला आहे म्हणून. हा गुच्छ तिला द्या—

**हरिभाऊ :** अहो, पण हा गुच्छ त्या नाच्या पोऱ्याचा आहे ना ?

**मामा :** मरूं द्या हो तो. आजचं जग दुसऱ्याच्या तव्यावर पोळी भाजून घेण्याचंच आहे.

**हरिभाऊ :** शिवाय प्रथम भेटींत गुच्छ देण्याची कल्पना इंग्रजी वाटते.

**मामा :** वाटूं द्या हो. अलीकडे कित्येक लेखकांचं लिखाण मूळ इंग्रजी-वरूनच घेतलेलं असतं. मग तुमच्या या लग्नाच्या नाटकाचा एखादाच धागा परकीय असला म्हणून काय झालं. हा गुच्छ तिला देऊन म्हणा—हा गुच्छ—माझ्या बागेंतल्या फुलांचा बनवून—मुद्दाम तुमच्यासाठीं आणलाय्.

**हरिभाऊ :** (गुच्छ घेऊन) हा गुच्छ—[ तोंच स्वयंपाकघरांतून आलेली नूतन दिसते. ] हा गुच्छ—हा गुच्छ केवढ्याला घ्यावा. [ मामा हताश होतात. ]

**नूतन :** असेल तीन चार रुपयांचा.

**हरिभाऊ :** नाहीं—हा मला फारच स्वस्तांत पडला. म्हणजे मीं हा एकाचा फुकटांत लाटला. [ मामा कपाळावर हात मारून आंत जातात. ] तुम्ही मला ओळखलंत ना ?

**नूतन :** हो—तुम्हांला कोण ओळखणार नाहीं ?

**हरिभाऊ :** सुंदर ! 'स्त्रियांचं सौंदर्य सेकंदकांट्याच्या गतीनं वाढतं तर पुरुषांचं सौंदर्य तासकांट्याच्या गतीनं वाढत असतं,' हें आज मला पटलं. तुम्ही खूपच सुंदर दिसायला लागला आहांत. नूतनबाई—

**नूतन :** ई—मला बाई म्हणूं नका बाई.

हरिभाऊ : नूतन–तूं आज खरोखरीच सुंदर दिसते आहेस.

नूतन : तुझ्यावर माझं प्रेम जडलं आहे–असं तर आतां तुम्ही म्हणणार नाहीं ना ?

हरिभाऊ : झाला–घात झाला. परीक्षेआधींच पेपर फुटला. झालं तर-आतां माझा प्रश्न तुम्हांला कळलाच आहे. तर उत्तर द्यायला विलंब लावूं नका. नका नका. माझ्या सर्वांगाकडे अशा रोखून पाहूं नका. त्याला आधींच घाम फुटलाय् हो. शिवाय माझा आजचा हा अवतार उद्यां बदलणार आहे. तुमचे वडीलच मघाशीं म्हणालेत तसं.

नूतन : म्हणजे ?

हरिभाऊ : माझे बोलविते धनी तेच आहेत. आणि या गुच्छाचे धनी ते नीतिनबाबू आहेत.

नूतन : [ गुच्छ घेऊन ] खरंच ! त्यांचा आहे हा गुच्छ ? How Lovely!

हरिभाऊ : होय हो. माझा नोहे धन्याचा हा माल–मी तो हमाल– भारवाही. या भारवाहकावर दया करा. मी लहानाचा मोठा झालों तो स्वतःच्या कर्तृत्वावर. मला परवां शब्द–कोड्यांत २३००० रुपये मिळाले तेवढेच लोकांच्या शब्द घालण्यावर. बाकी तें कोडं पोस्टाच्या पेटींत मात्र माझं मींच नेऊन टाकलं होतं. माझ्यांत दुसरं कांहीं नसेल, पण हृदयाचा प्रामाणिकपणा जरूर आहे. आणि विशेष म्हणजे हें वाक्य माझं स्वतःचंच आहे. तुमच्याशीं माझं लग्न झालं तर त्या २३००० रुपयांच्या तुमच्यावर मंगलाक्षदा उधळीन मी. तुम्हांला माझा हा पेशा पसंत नसला तर इथल्या नव्वद टिकल्यांवर लाथ मारून मी स्वतःचंच दैनिक काढीन.

नूतन : तुमच्या अंगांत एखादी कला आहे का ?

हरिभाऊ : नाहीं हो ! (आठवून) होय हो ! एकच काय, माझ्या अंगांत ६४ कला आहेत. गायनकलेंत तर माझी विशेष प्रगति आहे. लखनौच्या जमालखांचा–नाहीं–लाहोरच्या कव्वालखांचा मीं गंडा बांधला आहे. (पाहून) म्हणजे आतां तो घरीं विसरलाय्.

नूतन : मग एखादा ख्याल गाऊन दाखवा ना ?

हरिभाऊ : नाहीं–बेटा, लग्न झाल्याशिवाय तुझ्या कलेचं कुठंहि प्रदर्शन करूं नकोस–असा मला गुरूपदेश आहे. तुम्ही माझ्याशीं लग्न लावाल तर लग्नांतच

भटजीऐवजीं मीच मंगलाष्टकं म्हणेन. आणि तीं ख्यालांतच काय, पण ध्रुपदधमारांत गाऊन दाखवीन.

नूतन : ( हंसून ) हरिभाऊ–आडांतच नाहीं तर पोहऱ्यांत कुठून येणार ?

हरिभाऊ : नाहीं हो–तुम्हांला या आडाची कल्पना नाहीं अजून. निदान कांहीं विद्यार्थ्यांचे निकाल राखून ठेवतात. तसाच तुम्ही माझा निकाल उद्यांपर्यंत तरी राखून ठेवा हो.

नूतन : छे–छे–माझ्या दृष्टीनं तुमचा केव्हांच निकाल लागलाय्.

हरिभाऊ : झालं–म्हणजे निकालच लागला माझा.

नूतन : होय–माझ्या परीक्षेला तुम्ही कधींहि उतरणं शक्य नाहीं. ज्या पुरुषानं खूप जग पाहिलंय् असाच एखादा पुरुषोत्तम मला हवाय्. ( गुच्छ फ्लॉवर पॉटमध्यें ठेवून वर जातां जातां ) ज्या कलावंतावर हजारों स्त्रियांनीं प्रेम केलंय् अशाच एखाद्या कलावंताशीं मी लग्न करणार आहे.

नी–ति–न ( वर जाते )

मामा : ( प्रवेशून. ) कुठपर्यंत आलंय् ?

हरिभाऊ : जवळ जवळ ठरलंच—

मामा : काय ?

हरिभाऊ : कीं या भानगडींत पुन्हां पडायचं नाहीं म्हणून. हा तुमचा गुच्छ घ्या आणि तीं प्रुफं अन् फोटो इकडे द्या. निम्मा अंक मशिनवरच चढवून आलोंय् मी. आतां प्रुफं वाचतां वाचतांच जीवन जगवीन आणि प्रुफं वाचतां वाचतांच देह ठेवीन. या देहाचा ब्लॉक होईपर्यंत लोकांच्याच फोटोंचे ब्लॉक्स करीत बसेन.

मामा : अहो थांबा–धीर सो गंभीर. ती म्हणाली तरी काय ?

हरिभाऊ : म्हणे, 'ज्या पुरुषानं खूप जग पाहिलंय् असाच एखादा पुरुषोत्तम मला हवाय्. ज्या कलावंतावर हजार स्त्रियांनीं प्रेम केलंय् अशाच एखाद्या कलावंताशीं मी लग्न करणार आहे.' आमच्यावर हजार कुठल्या एकाहि स्त्रीनं कधीं प्रेम केलं असेल तर शपथ.

मामा : ( विचार करून ) यापूर्वी केलं नसेल तर यापुढं करायला लावूं.

हरिभाऊ : अहो, पण हें सारं कशाकरतां ? लग्नाकरतांच ना. पण माणसाला दोन वेळां जेवण अन् रात्रभर भरपूर झोंप मिळाल्यावर लग्नंबिग्नं हवींत

कशाला ? मामासाहेब, लग्नाच्या बाबतींत तुम्हीं आम्हांला असं मामा बनवलं नसतंत तर आयुष्याच्या अंतापर्यंत आम्हांला लग्नाची आठवण तरी झाली असती कीं नाहीं कोणास ठाऊक. पण काय हो—मीं नूतनशीं लग्न लावलं तरी ती माझ्याशींच लग्न लावील कशावरून ?

**मामा :** ती नाहीं तिचा बाप लावील. माझं सारं बुद्धिबळ खर्चून त्या नर्तनशहाला या सहसंपादकाचा काटशह देईन. नवकथा—नवकादंबऱ्या—नवकाव्य—याप्रमाणें मी आतां नवहरिभाऊ निर्माण करणार आहें.

**हरिभाऊ :** पण त्यासाठीं तुम्हांला नवनायिका पाहावी लागणार.

**मामा :** अहो, प्रत्यक्ष कशाला ? एखाद्या थापेवरसुद्धां काम भागण्यासारखं आहे. (हातांतील फोटोकडे पाहून—विचार करीत मामासाहेब फिरतात.) हरिभाऊ, शिर सलामत तो कल्पना हजार— नूतनला हजार स्त्रियांनीं ज्या कलावंतावर प्रेम केलंय् असा नवरा पाहिजे आहे काय ? लाहोरच्या कव्वालखांचा गंडा बांधून तुम्हांला कलावंत तर मीं बनवलंच आहे. आतां हजार स्त्रियांचं प्रेम— (फोटोकडे पाहात) सांपडली— आली— सुचली. हरिभाऊ हर्षे, पूर्वीच्या नवर-देवांना धनुष्यं मोडावीं लागलीं आहेत—मत्स्यभेद करावे लागले आहेत— लढाया माराव्या लागल्या आहेत. आपल्याला फक्त एक थाप मारायची आहे. एकच थाप. एकच प्याला लिहून गडकऱ्यांनीं जेवढं यश मिळवलं नसेल त्याच्या दसपट यश— एकच थाप मारून हा मामा मालवणकर मिळवून दाखवणार. वा— वा— काय बेमालूम थाप आहे. 'हरिभाऊ हर्षे लाहोरला असतांना त्यांच्या गाण्यावर प्रसिद्ध स्टंटक्वीन— सिनेमासम्राज्ञी (फोटो दाखवून) मिस् झेलम खूष होऊन तिचा प्रेमप्रवाह हरिभाऊकडे वळला.

**हरिभाऊ :** थांबा थांबा— या कल्पनेनंच या प्रवाहाच्या धबधब्यांत गुदमरून गेल्यासारखं झालंय् मला.

**मामा :** हरिभाऊ, आणि आपण या बातमीला जर वर्तमानपत्रांतून प्रसिद्धि दिली तर रिटा हेवर्थ—प्रिन्स अलीखान यांच्या लफड्याच्या बातमीप्रमाणं, ही बातमी जगभर पसरून एका रात्रींत तुम्ही आंतरराष्ट्रीय कीर्तीचे पुरुष होऊन जाल.

**हरिभाऊ :** म्हणजे ही थाप तुम्ही वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करणार काय ?

मामा : Of Course. त्याशिवाय या प्रकरणाची जिकडे तिकडे बोंबाबोंब होऊन, नूतनचं प्रेम तुमच्याकडे कसं वळेल ?

हरिभाऊ : अहो, पण थाप मारायची ती लोकांना पटेल अशी हवी ना. अहो, शेरपा तेनसिंग एक वेळ पुन्हां गौरीशंकराचं शिखर गांठील, पण हा शेळपा हरिभाऊ त्या मिस् झेलमचा पायथाहि गांठूं शकणार नाहीं. मामासाहेब, अॅटमनें भडका होणार नाहीं इतका माझ्या अन् झेलमच्या या बातमीनें भडका होईल हो. शिवाय ती माझ्यावर खूष होती याला प्रूफ काय ? प्रूफ निर्माण करणं हें प्रुफं तपासण्याइतकं सोपं आहे काय ? थाप मारायची तर (एक वृत्तपत्र उचलून) या खटाव मिल्सच्या जाहिरातींतील ही मुलगी घ्या. लक्स–साबणाच्या जाहिरातींतली ही एक्स्ट्रॉ नटी घ्या – ही बाई घ्या.

मामा : ही ? अहो, हा तरुणपणीं रुक्मिणीच्या वेषांत काढलेला बालगंधर्वांचा फोटो आहे.

हरिभाऊ : सोडून द्या–ही घ्या.

मामा : अहो, हा नूरजहानचा फोटो आहे. ही मरून ३०० वर्षे झालीं.

हरिभाऊ : मरूं द्या–ही घ्या.

मामा : Yes ! हीच ती–तीच ही–मिस झेलम—

हरिभाऊ : मग ती नको. ती खटाव मिलसचीच पोरगी घ्या.

मामा : नाहीं नाहीं —हीच. अहो डिपॉझिट जप्त व्हावं तर लाखाचं. तसं थाप मारावी ती प्रसिद्ध नटीच्या बाबतींत. आपली नूतन या बातमीनें त्या नाचऱ्या पोऱ्याला तसाच नाचत ठेवून थेट तुमच्याकडे धांवत येईल अन् म्हणेल–मला पदरांत घ्या. आमचं कुटुंब तर सध्यां गांवांत लागलेल्या झेलमच्या जादू–इ–कत्तल सिनेमाचे ४ फ्री– पासेस तुमच्याकडे मागेल.

हरिभाऊ : सध्यां मिस झेलमचा एखादा बोलपट गांवांत चालू आहे काय ? ( बसतो. )

मामा : होय. आणि परवांच त्या बोलपटाची ज्युबिली साजरी होणार आहे.

हरिभाऊ : छान ! म्हणजे ही थाप लोकांत पचली नाहीं तर त्या दिवशीं लोक चित्राची ज्युबिली–झेलमचा सत्कार–आणि माझी पुण्यतिथि बरोबरच

साजरी करतील. शिवाय मामासाहेब, हें प्रकरण समजल्यावर नूतन उलट माझा तिरस्कार करूं लागली तर ? हो म्हणजे—नूतनला वश करायला आपण झेलम प्रकरण उभें करायचें तर झेलम प्रकरण उभं राहिलं म्हणून नूतन मला नाकारायची. म्हणजे हा दोन्हीकडचा नवरा उपाशींच राह्यचा.

**मामा :** छे हो—तिला हजार स्त्रियांनीं प्रेम केलंय् असा कलावंत हवाय् नाहीं का ? मग घे म्हणावं. 'हजार स्त्रियांचं सौंदर्य अन् कीर्ति जिच्यांत ठासून भरलीं आहेत अशी झेलम माझ्यावर फिदा आहे.' माझ्यावर म्हणजे तुमच्यावर. हा झेलमचा फोटो तुमच्या खिशांत ठेवा. (ठेवतो) हें आणखी एक प्रूफ.

**हरिभाऊ :** छे छे— तिचा फोटो माझ्या खिशांत असणं हें कांहीं तिचं माझ्यावर प्रेम असण्याला पुरेसं प्रूफ नाहीं. कारण तसं म्हटलं तर माझ्या खिशांत हा मारुतीचाहि फोटो आहे.

**मामा :** Yes ! तुमची शंका बरोबर आहे. (आठवून) कांहींतरी लेखी पुरावा हवा. थांबा— आणा. त्या फोटोवर, नेहमीं नट्या लिहितात त्याप्रमाणं आपणच कांहींतरी लिहूं या. (लिहितो) मेरे प्यारे हरि— तुमारी झेलम. वा !—वा ! मेरे प्यारे हरि—तुमारी झेलम— आतां हा बार ठासून भरला. (ममीसाहेब येतात. त्यांना पाहून मुद्दामच खोटया रागानं) हर्षे, लाहोरला मीं तुम्हांला 'ट्रिमकी'च्या कामाला धाडलं तर तुम्ही हा बाजा वाजवून आलां होय ?

**हरिभाऊ :** (ममींना पाहून) पण मी—लाहोर शब्द फक्त वाचलाय् हो—प्रत्यक्ष——

**मामा :** मग ही पंजाबांतली झेलम महाराष्ट्रांत कशी उपटली ?

**ममी :** बघूं बघूं —(फोटो घेते) किती सुंदर आहे !

**मामा :** छे छे—मला हें खरं सुद्धां वाटत नाहीं.

**हरिभाऊ :** नाहींच खरं तें.

**ममी :** नाहीं कसं. खरंच असलं पाहिजे. (वाचते) मेरे प्यारे हरि——

**मामा :** तुम्हारी झेलम—एका सिनेमा नटीचं तुमच्यावर प्रेम ! आणि तुम्ही माझे सहसंपादक ?

**हरिभाऊ** : ( धीट होऊन ) हो—आहे तिचं माझ्यावर प्रेम. तिचंच काय, यापूर्वी ९९९ स्त्रियांचं माझ्यावर प्रेम होतं. ही हजाराव्वी. नोकरीचे ८ तास तुमची टिमकी वाजवल्यावर बाहेर मीं बाजा वाजवावा का ताशा बडवावा हा माझा खाजगी प्रश्न आहे.

**मामा** : बाहेर तुम्ही ताशा बडवा नाहीं तर ढोल पिटा. तो माझा प्रश्न नाहीं. पण मला वाईट इतकंच वाटतं कीं, तुमच्यासारख्या मवाल्याला मी माझी मुलगी देणार होतों.

**हरिभाऊ** : हो—आणि मी तिच्याशीं लग्नहि करणार होतों. तुम्हीं सांगितलंत म्हणूनच.

**मामा** : ( ओशाळून, पण रागाचं नाटक चालू ठेवीत. ) विसरा—विसरा आतां तें. म्हणे, मीं सांगितलं. हा फोटो मींच आणला असेल. यावरचा हा मजकूर मींच लिहिला असेल.

**ममी** : मी म्हणतें—झेलमनींच लिहिला. असेल तिचं यांच्यावर प्रेम, म्हणून लिहिलं असेल तसं तिनं. लग्नाआधीं नवरानवरीचीं चरित्रं पाहिलीं जातीं तर जगांत आजवर एकहि लग्न झालं नसतं, आणि लग्नानंतरहि तीं उजेडांत आणलीं गेलीं तर घराघरांतून घटस्फोटाचे अर्ज येऊं लागतील.

**हरिभाऊ** : हें मात्र खरं हं. नवऱ्याचं मूळ आणि सुंदर स्त्रियांचं कूळ पाहूं नये हें उत्तम.

**ममी** : आणि झेलमसारख्या सुंदर श्रीमंत—आणि प्रसिद्ध नटींनीं यांच्यावर प्रेम करावं यांत यांचा गौरवच नाहीं का ? आणि असा एक सुप्रसिद्ध पुरुष तुमच्या 'टिमकी'चा सहसंपादक निघावा याचा तुम्हांला अभिमान वाटायला पाहिजे. हर्षे, मी तुमचं अभिनंदन करतें. हिनं काम केलेला एकहि बोलपट पाहिल्याशिवाय मी राहात नाहीं. जादू—इ—कत्तल——तर मीं चारदां पाहिला. ज्युबिलीच्या दिवशीं तुम्ही ४ फ्री पासेस आणलेत तर पुन्हां सुद्धां पाहीन मी तो. खरंच, मी पुरुष असतें तर हिच्याशींच लग्न केलं असतं.

**मामा** : आणि मला तसं कांहीं वाटत नाहीं असं समजूं नका हं. पण—

**ममी** : तुमचं आपलं कांहींतरीच ! हरिभाऊ, आणाल ना फ्री पास—

**हरिभाऊ** : अहो ममीसाहेब—तुम्ही काय ऐकतां आहांत यांचं ! हिच्याकडं मी फ्री पास मागायला गेलों तर ही म्युनिसिपालिटींतून माझा मृत्युपासच

काढून माझ्या हातांत देईल. खरं पाहिलं तर मीं हिला पडद्यावर तरी पाहिलीय् पण हिनं मला स्वप्नांत सुद्धां पाहिलं नसेल.

मम्मी : होय ना. वास्तविक तुमच्यांत विशेष असं कांहींच नाहीं कीं–

हरिभाऊ : नाहीं नाहीं– तसं समजूं नका हं. त्यांतून या नटी पैसा लुबाडतांना एखाद्या कुबेराला कंगाल बनवतील तर प्रेमाची निवड करतांना माझ्या-सारख्या एखाद्या कंगालालाहि कुबेर करून सोडतील.

मम्मी : खरंच, यापूर्वी आम्हीं तुम्हांला पुरतं ओळखलं नव्हतं.

हरिभाऊ : आणि अजूनहि तुम्ही कांहीं ओळखलंय् असं मला वाटत नाहीं.

मम्मी : पण हलकें हलकें आतां आम्हाला कळेलच कीं सारं. मलाच काय पण उद्यां हें साऱ्या गांवांत होईल. नूतन – ए नूतन – अग हें बघ काय, तें ( फोटो घेऊन धांवत धांवत वर जातात. )

मामा : चालला–हरिभाऊ, आपल्या थापेला रंग भरत चालला. आतां बघा–तासाभरांत या बातमीची साऱ्या गांवभर बोंबाबोंब होईल. कारण बायकांचीं तोंडं हीं ब्रह्मदेवानं काढलेलीं खास बातमी–पत्रंच आहेत. आतां आमच्या ह्या, ही बातमी आमच्या नूतनला सांगतील. नूतन त्या नाच्याला सांगेल. आणि तो नाचा तर ही बातमी घेऊन साऱ्या गांवभर नाचत सुटेल.

शंखनाद : ( प्रवेशून ) बातमी ? अहो, मग प्रथम ती मला सांगा.

मामा : काय सांगायचंय ? सुप्रसिद्ध स्टंट क्वीन – सिनेमासम्राज्ञी मिस् झेलमची अन् हरिभाऊंची भानगड होती म्हणे.

शंखनाद : ओ – सेन्सेशनल – मार्व्हलस ( लिहितो ) अरे–हो. मुख्य तें विसरलोंच. हरिभाऊ तीं प्रुफं हवीं आहेत छापखान्यांत लवकर. निम्मा अंक माशिनवर तसाच पडून राहिलाय्.

हरिभाऊ : अरे, खरंच कीं. मामासाहेब झालं एवढं थापस्तवन इतकंच पुरें. आपल्या अंकाची सिद्धता करायला नको का ?

मामा : छे–छे–हर्षे, आतां 'टिमकी'च्या अंकाची सिद्धता करण्यापेक्षां तुमच्या लग्न–नाटकाच्या अंकाचीच सिद्धता करायला सिद्ध व्हा. मेरे प्यारे हरि– ( वरून नूतन, नीतिन, मम्मी येतात. )

नूतन : मला हें खरं मुद्रां वाटत नाहीं. मिस झेलस् ? ( फोटो ममीच्या हातांत देते. )

ममी : प्रसिद्ध सिनेमासम्राज्ञी. ( फोटो नीतिनच्या हातांत देते. )

नीतिन : स्टंट क्वीन ? ( फोटो शंखनादाच्या हातांत देतो. )

शंखनाद : होय. आणि तिचं या हर्षावर प्रेम. ( फोटो नूतनच्या हातांत देतो. )

नूतन : शक्यच नाहीं. मेरे प्यारे हरि—

हरिभाऊ : ओ–

नूतन : Shut up ! ( त्याच्या अंगावर फोटो मारते. )

हरिभाऊ : नूतनबाई, हें खरं नाहीं हो. तुम्ही मला Shut up ! म्हणालांत आणि माझी श्वासनलिकाच Shut up ! व्हायच्या बेतांत आली आहे हो. मी जातों. मामासाहेब आणि मंडळी तुमच्या या नाटक कंपनीला माझा कायमचा रामराम. ( जाऊं लागतो. )

नीतिन : ( त्याला अडवून ) हरिभाऊ, या नटीकडून माझ्या डान्सिंग–बॅलेच्या वॅर्ल्ड टूरला फिनान्स मिळवून द्याल तर मी तुम्हांला आयुष्याच्या अंतापर्यंत फुकट डान्स शिकवीन. किमान वर्षा तिची मला टयूशन तरी मिळवून द्याच. निदान माझ्याबद्दलचं ओळखपत्र तरी–

मामा : अहो, द्या. झेलमला याचं ओळखपत्र म्हणजे हलवायाच्या घरावर तुळशीपत्र. त्यांत तुमच्या बापाचं काय जायचंय् !

ममी : नाहीं हो–आधीं मला जादू–ई–कत्तलचे चार फ्री पासेस–

नीतिन : नाहीं नाहीं– फिनान्स–निदान टयूशन–कमींत कमी ओळखपत्र.

शंखनाद : त्या सर्वांच्या आधीं मला एखादी मुलाखत द्या. तुमची मुलाखत आपल्या टिमकींत आली तर निदान आपले पगार तरी वेळच्या वेळींच आणि नक्की मिळतील.

हरिभाऊ : नूतनबाई, तुमची काय रिक्वेस्ट आहे ?

नूतन : ( एकदम पाऊटून ) रिक्वेस्ट नाहीं, ऑर्डर आहे. माझा तुमच्यावर हक्कच आहे तसा. तो गुच्छ द्या इकडे.

हरिभाऊ : ( घाईघाईनें ) हा घ्या.

नूतन : तीं पुर्फं द्या इकडं.



**शंखनाद** – हरिभाऊ, मला एक मुलाखत द्या !

हरिभाऊ : ही घ्या.
नूतन : एक काड्याची पेटी द्या.
हरिभाऊ : मी विड्या ओढीत नाही.
शंखनाद : ही घ्या. ( त्या आगपेटीनं तीं प्रुफं पेटवते. )
नूतन : हरिभाऊ–तुम्ही तुमचा निकाल उद्यांपर्यंत राखून ठेवायला सांगितला होता ना ? मी आंजच, आतांच देतें निकाल. या तुमच्या प्रेमाच्या गुच्छाचा मी स्वीकार करतें. ही तुमच्या हलक्या नोकरीची होळी. मी तुमच्याशीं लग्न लावायला तयार आहें. जा, मुहूर्त ठरवा. ( वर जाते )
हरिभाऊ : ( प्रेमानं वर जात ) नूतन—
नीतिन : ( त्याला थोपवून ) नूतन–शुद्वीवर आहेस काय ? ( रागानें वर जातो )
ममी : ( अर्धवट आनंदानं ) नूतन– ( वर जाते )
शंखनाद : बाई, बाई,तुमचा एखादा तयार ब्लॉक आहे का? (बेल वाजते).
हरिभाऊ : मामासाहेब, गंगेत घोडं न्हालं ! उद्यां अग्रलेखाऐवजीं माझ्या लग्नाच्या बातमीनंच आख्खी टिमकी भरून टाकतों. ( धांदलीनें जातो )
शंखनाद : पण मग ती मुलाखत–हरिभाऊ, अहो ती मुलाखत–मामा—
मामा : ( फोनमध्यें ) Hallow !-ऑ ? परवां मिस झेलम गांवांत येणार आहे ? तिचा सत्कार करणार आहांत ? माझ्या अध्यक्षतेखालीं–( शंखनाद लिहून घेतो ) ( फोन टाकून कपाळावर हात मारून ) छान् ! करायला गेलों एक अन्— ( पडदा पडतो )

# २

[ **स्थळ** —पहिल्या अंकांतीलच. मागच्या अंकानंतर २ दिवसांचा काळ लोटला आहे. वेळ सकाळची. टेलिफोनची घंटा वाजते. ममीसाहेब येऊन फोन घेतात. ]

**ममी :** ( खुषीनें ) हॅलो ! राणीसाहेब ! बोला. आज रात्रींच्या ज्युबिली समारंभाला जायचंय तुम्हांला ! नाहीं, नाहीं. हरिभाऊंनीं फक्त आमच्या-साठींच फ्री पासेस आणायचं कबूल केलंय. एँ ! हो, ती बातमी खरी आहे. पण आतां कांहीं नाहीं त्यांचं. तुमची मुलगी लग्नाची आहे ! अहो, पण ८ दिवसांनीं हरिभाऊंचं आमच्या नूतनशीं लग्न होणार आहे. तुम्हीं आजचीं वर्तमानपत्रं वाचलेलीं दिसत नाहींत. हो–हो–हे बातमीदार मेले असेच शंख असतात. ( शंखनाद येतो. )

**शंखनाद :** मला हांक मारलीत ?

**ममी :** Thanks ! ( रिसीव्हर खालीं ठेवतात. )

**शंखनाद :** अहो ममीसाहेब, तुम्ही केवढा घोटाळा केलांत. मीं तीं पातळं तुम्हांला आणून दिलीं म्हणून तुम्ही सांगितलंत वाटतं मामासाहेबांना !

**ममी :** मग ? उलट यांचे बाहेरचे चाळे मला तुमच्यामुळें कळले, याबद्दल मी तुमची आभारी आहें.

शंखनाद : पण मामासाहेबांनीं मला नोटिस दिली आहे.

ममी : तुम्ही कांहीं काळजी करूं नका. मी सांगेन त्यांना. शिवाय आतां आमचे होणारे जांवई हरिभाऊ तुमचे संपादक झाले आहेत ना? त्यांनाहि मी सांगेन.

शंखनाद : Thank you! ममीसाहेब, नूतनबाईंच्या लग्नाची बातमी वाचलीत तुम्ही?

ममी : वाचली कीं. किती छान आहे!

शंखनाद : मींच लिहिलीय् ती. तसंच हरिभाऊ आणि मिस झेलम यांच्या लफड्याची हकीकत मींच छापली आहे. आहे कीं नाहीं खुसखुशीत? या बातमीनं आमच्या 'टिमकी' च्या अंकाची आज २ तासांत चटणी उडली. मी इतकंच करून थांबणार नाहीं तर उद्यांच्या अंकांत हरिभाऊ हर्षांची समग्र मुलाखतच छापणार आहें. हरिभाऊ वर आहेत का?

ममी : नाहीं, अजून आले नाहींत ते.

शंखनाद : बरं, मग मी जरा वेळानें येतों. तेवढं आमच्या नोटिशीचं– (जाऊं लागतो)

मामा : (प्रवेशून) काय हो! तुम्ही अजून इथंच? नोटिस मिळाली कीं नाहीं?

ममी : तुमचं आपलं कांहींतरीच. कशाबद्दल हो नोटिस दिली यांना?

मामा : अहो, यांनीं छापखान्यांतल्या ब्लॉकसचीं पार्सलं पळवलीं.

ममी : आहे ठाऊक मला. (मामासाहेब आश्चर्यचकित होतात.) मींच मागितलीं होतीं तीं पार्सलं. त्यांनीं तीं मलाच आणून दिलींत.

मामा : (थाप अंगाशीं आल्यामुळें काढता पाय घेत) होय का– (जातात.)

शंखनाद : ममीसाहेब–मामासाहेबांच्या पत्नी शोभतां खऱ्या. काय बेमालूम थाप मारलीत हो.

(नूतन वरून येते. आतां तिनं जरा नीटनेटकी वेषभूषा परिधान केली आहे. एखाद्या नववधूप्रमाणेंच ती लाजत लाजत येते.)

नूतन : ममी—

**ममी** : ये नूतन. शंखनाद, आज—आमची नूतन किती छान् दिसते आहे नाहीं ? माझं लग्न ठरलं तेव्हां मी सुद्धां अशीच सुंदर दिसत होतें म्हणे.

**शंखनाद** : शक्य आहे. ' नवऱ्या मुली लग्न ठरल्यावर सुंदर दिसतात तर नवरे मुलगे लग्न झाल्यावर सुंदर दिसूं लागतात. '—अशा अर्थाची परवांच एका मानसशास्त्रज्ञानं मला मुलाखत दिली होती.

**नूतन** : ममी, तुझा हा उत्साह पपांनीं पाहिला तर ते म्हणतील लग्न मुलीचं ठरलं आहे कीं आईचं ?

**ममी** : त्यांचं पुरे. त्यांचा उत्साह तर जणुं काय त्यांचंच लग्न ठरल्याप्रमाणं उतूं चाललाय्. आज दोन दिवस उठल्याबरोबर भूपाळीऐवजीं जादू—इ—कत्तलमधलींच गाणीं बडबडत सुटतात.

**शंखनाद** :....अहो, त्यांच्यांतच काय, पण या बातमीनं साऱ्या गांवांत खळबळ उडली आहे. ( एक अंक दाखवून ) हें काय—' टिमकी ' चे माजी संपादक मामासाहेब मालवणकर यांच्या एकुलत्या एक कन्येचा आजी संपादक हरिभाऊ हर्षे यांच्याशीं लवकरच विवाह होणार आहे. ( दुसरा अंक पुढें करून ) सहसंपादकाचा संपादक कसा झाला ? हें तिसरं वृत्तपत्र—'टिमकी' चे संपादक हरिभाऊ हर्षे आणि जादु—इ—कत्तलच्या नायिका मिस झेलम यांचं प्रणय प्रकरण. हें चौथं— मासिक मजेदार भविष्य— हरिभाऊंचा प्रेयसीपालट होणार. आणि 'टिमकी' चे हे संपादकीय.—कला आणि जीवन यांचा संगम. या बातम्यांनीं हरिभाऊ तर मावळत्या प्रेयसीचे प्रियकर आणि उगवत्या पत्नीचे पति या दुहेरी नात्यानं एका रात्रींत— प्रसिद्धीच्या शिखरावर जाऊन बसले आहेत.

**ममी** : होय ना. शिवाय सकाळपासून फोन तरी किती येताहेत म्हणून सांगूं ! महिला—मंडळाला म्हणे नूतनचा सत्कार करायचाय्. ब्लॅकमेल फोटो स्टुडिओला, हरिभाऊ—नूतनचा बस्ट हवाय्. स्वस्तिक क्रास बॅन्डवाला तर म्हणतो कीं, हिच्या वरातीला आम्हांलाच ऑर्डर द्या. हें तर कांहींच नाहीं. चित्तापूरच्या डाविजर राणीसाहेब तर हरिभाऊंच्या स्थळाबद्दलच मला विचारीत होत्या.

**नूतन** : हं— यांचं स्थळ असं वाटेवर पडलंय् होय ? शिवाय संस्थानं गेलीं म्हणावं आतां.

ममी : शिवाय तिची पोरगी म्हणे मागं त्यांच्या ड्रायव्हरबरोबरच पळून गेली होती.

शंखनाद : ( वही काढत ) कुठं ? केव्हां ?

ममी : तुमचं आपलं कांहींतरीच. खूप मागची गोष्ट आहे ती.

नूतन : खरंच ! ममी, कोणाचीहि दृष्ट लागावी असंच यांचं स्थळ आहे. आतां किती तरी मुली माझा मत्सर करतील.

शंखनाद : होय ना– त्या मिस् झेलमला कळलं तर तीसुद्धां येऊन तुमच्या झिंज्या उपटायला कमी करणार नाहीं.

नूतन : आणि मग हे सुद्धां कांहीं स्वस्थ बसणार नाहींत. मांजरीच्या पिला-प्रमाणं खिडकींतून फेकून देतील तिला. ममी संपादकाची बायको होण्यांत किती मानमरातब भरला आहे याची तुला कल्पना नाहीं मग ( त्या हतबुद्ध होतात. ) आणि ममी, तुला कळलं का ? हे म्हणे छान गातात.

ममी : अगं बाई हो !

नूतन : होय ना–लाहोरच्या कव्वालखांचा म्हणे गंडा बांधलाय् त्यांनीं. आज मला ते दाखवायला आणणार आहेत तो गंडा.

शंखनाद : शिवाय परवांच्या शब्दकोड्याच्या पहिल्या २३,००० रुपयांच्या बक्षिसाचेहि ते मानकरी आहेत. माझ्यासारख्या दळभद्या बातमीदाराच्या दृष्टीनं हाच मुद्दा सर्वांत महत्त्वाचा आहे.

नूतन : मिळणारच त्यांना बक्षीस. प्रत्येक शब्द तोलून–मापून टाकणाऱ्या त्यांना शब्दकोड्यांत एकदांच काय, पण हजारदां २३,००० रुपयांचीं बक्षिसं मिळतील. शिवाय ते दिसायला सुद्धां नीतिनपेक्षां कितीतरी–पण जाऊं दे. तुम्ही उगीच चेष्टा कराल माझी.

शंखनाद : नका सांगूं. तुम्हीं नाहीं सांगितलंत तरी आम्हांला कल्पना आहे त्याची. ( लिहितो ) हरिभाऊ हर्षे मदनाचे अवतार आहेत–असं नूतनबाई खाजगी बोलतांना माझ्याजवळ म्हणाल्या.

नूतन : त्यांच्याशीं माझं लग्न ठरल्यापासून त्यांच्याविषयीं मला कांहीं-तरी निराळंच वाटूं लागलं आहे. [ शंखनाद लिहितो ] अगदींच मला राहावेना—

शंखनाद : अगदींच मला राहावेना– म्हणून तुम्ही काय केलंत ?

**नूतन :** पपांशीं कांहींतरी काम काढल्याचं निमित्त काढून त्यांना छाप-खान्यांतून पाहूनहि आलें.

**शंखनाद :** ॲंड–सुप्रसिद्ध विदुषी–नर्तनसम्राज्ञी नूतन यांची टिमकीच्या कचेरीस भेट.

**नूतन :** अहो, पण छापूं नका तें. पपांना माहीत नाहीं तें. ( खोडतो ) ममी, त्यांच्यांत अगदीं आमूलाग्र फरक पडलाय्. पहिली गोष्ट म्हणजे त्यांनीं मिशांना साफ चाट मारली आहे.

**ममी :** आणि काय गं, आज म्हणे ते सुटाबुटांत होते.

**नूतन :** होय ना. अगदीं साहेब झालीय् स्वारी.

**शंखनाद :** काय म्हणतां ! अरे मग त्यांचा फोटोच मिळविला पाहिजे मला. खालीं मुलाखत अन् वर फोटो– वा वा–'टिमकी'चं भाग्यच उजळेल म्हणायचं. ( जातो. )

**ममी :** आणि हे सांगत होते कीं, तो सूट त्या मिस झेलमनं लग्नाची भेट म्हणून पाठवलाय म्हणे त्यांना.

**नूतन :** ( रागानं ) होय ! थांब. येऊं दे त्यांना. त्यांचा तो सूट घेतें आन् बोहारणीलाच देऊन टाकतें. आणि त्यांना सरळ बजावतें कीं.......... हजार बायकांनीं प्रेम केलेला पुरुष मला आवडतो. पण त्यांनीं त्या पुरुषाला कांहीं दिलेलं मुळींच आवडत नाहीं मला. ( निघून जाण्याच्या तयारीनं नीतिन येतो. )

**नीतिन :** नूतन–नो मोस्से–जातों मी. एका दिवसांत तूं इतकी बदलशील याची कल्पना नव्हती मला.

**नूतन :** मग काय करूं तर ? गेल्या तीन वर्षांत तुम्ही फक्त मला नाचच शिकवलांत. पण एकदां तरी लग्नाचा विषय काढलात का ?

**नीतिन :** ( आश्चर्यानं ) म्हणजे ? ओघाओघानं त्या मुद्याला मी येणारच होतों. पण मला वाटलं तूं रागावशील.

**ममी :** हो– तुमचं आपलं कांहींतरीच. बायकांना काय हवं असतं हें सुद्धां तुम्हांला ठाऊक नाहीं.

**नीतिन :** ठीक आहे. यापुढं माझ्या डान्सिंग स्कूलमध्यें येणाऱ्या कुठल्याहि मुलीशीं आधीं लग्नच लावीन आणि मगच तिला डान्स शिकवीन. किंवा

तसं कशाला आत्तांच्या आत्तां कपाळाला मुंडावळ्या बांधून मी नूतनशीं लग्न लावायला तयार आहें.

**ममी :** हो–त्या कपाळाला मुंडावळ्या बांधणं हें पायांत घुंगरं बांधण्याइतकं सोपं आहे काय? त्या हरिभाऊप्रमाणें तुमच्यावर एखादी श्रीमंत सुंदर आणि प्रसिद्ध नटी खुष झाली आहे का?

**नीतिन :** नसेल. गुणानं तिच्याएवढी मोठी नटी माझ्यावर खुष झाली नसेल; पण संख्येनं यापूर्वी किती स्त्रियांनीं माझ्यावर प्रेमं केलीं आहेत याची जंत्री तुम्हांला ऐकवूं काय?

**नूतन :** चालते व्हा. तुमच्या प्रणयकथांचं श्रवण करायची मला जरूर? आणि आतां हरिभाऊ इथं येणार आहेत. त्यांच्या समोर हा फार्स नको?

**नीतिन :** हा फार्स नको? येवढ्यानं काय झालं आहे? हा फार्स इतका ताणतो कीं ताडकन् तो तुटलाच पाहिजे. त्या मिस् झेलमचा खरा प्रियकर कोण आहे हें तुम्हांला माहिती आहे का?

**हरिभाऊ :** ( प्रवेशून ) मी–मी होतों. काय म्हणणं आहे आपलं? ( हरिभाऊंच्यांत आतां आमूलाग्र बदल झालेला असून त्यांच्या हातांत वेणी आहे. त्यांनीं घातलेला सूट त्यांना सांवरतां येत नाहीं. कपाळचं गंधहि हॅटशीं विसंगत वाटतं. ) माझ्या होणाऱ्या बायकोला दम भरणाऱ्याचा दम मी एका दमांत उखडल्याशिवाय राहणार नाहीं– Get Out! या साहेबी पोषाखाचं सामर्थ्य तुम्हांला माहीत नाहीं महाराजा!

**नीतिन :** पाहूं ना. घोडामैदान जवळच आहे. ( जाऊं लागतो पण पुन्हां थबकून ) हरिभाऊ हर्षे, हिची पूर्वीची कॅरेक्टर माहीत आहे तुम्हांला?

**नूतन :** काय हो मीं केलं?

**हरिभाऊ :** तूं गप्प बैस. आतां तुझ्या बाजूनं बोलायला मी आहें ना? साहेब गेला तरी साहेबी पोषाखाचा हिसका तो कसा ठेवून गेला आहे, हें याला मी न दाखवीन तर मिशी उतरून देईन. अरे, ती आधींच उतरवली आहे नाहीं का. हरकत नाहीं. काय म्हणालांत आपण?

**नीतिन :** हिची पूर्वीची कॅरेक्टर माहीत आहे तुम्हांला?

**हरिभाऊ :** नसूं दे. माझी तरी पूर्वीची कॅरेक्टर कुठं आहे माहीत हिला?

**नीतिन :** हिचं माझ्यावर प्रेम होतं.

**हरिभाऊ :** मग माझेंहि मिस् झेलमवर प्रेम होतं. मेहेरबान, लग्नाआधीं एखाद्या पुस्तकाच्या हक्काप्रमाणं प्रेमाचे 'सर्व हक्क स्वाधीन' एकाच्या हातांत कधींच नसतात. प्रेमाच्या दर नव्या आवृत्तिगणिक ते बदलत असतात.

**नीतिन :** अस्सं ? तुमचं लग्न ठरल्यापासून तुमच्यांत बरीच क्रांति झालेली दिसतेय्. पण लक्षांत ठेवा, मीं हें लग्न मोडल्याशिवाय राहणार नाहीं. ( तावातावानं जातो. )

**हरिभाऊ :** जा. जा. मोड जा. आतां ब्रह्मदेव आडवा पडला जरी हें लग्न मोडणं शक्य नाहीं. ( एकदम हलक्या आवाजांत सौजन्यपूर्वक ) मीं—ही — वेणी आणली आहे. ( ममीसाहेब डोक्यांत घालूं लागतात. नूतन व हरिभाऊ हताश होतात. )

**नूतन :** ममी, तुझ्यासाठीं नाहीं आणली त्यांनीं वेणी.

**ममी :** अगबाई खरंच कीं—किती मूर्ख मी. घे बाई. ( देते ) पण म्हटलं हरिभाऊ इतक्यांतच आम्हांला विसरूं नका.

**हरिभाऊ :** छे-छे-ममीसाहेब मी, तसा नाहीं हं. मी तुम्हांला कधींच विसरणार नाहीं. एकदां मी तुमचा घरजांवई झाल्यावर तुमच्या आमच्या रात्रंदिवस गांठी भेटी पडणारच कीं ! ही वेणी मीं तुमच्यासाठींच आणली होती.

**ममी :** हो ? थँक्यू. ( पुन्हां वेणी घेते व डोक्यांत घालते. ) अहो, ऐकलं का ! ही पाहिलीत का हरिभाऊंनीं माझ्यासाठीं वेणी आणली आहे. ( आनंदानं मामांच्या खोलींत जाते. कांहीं वेळ दोघंहि बोलत नाहींत. नव्या सुटामुळें हरिभाऊची अस्वस्थता अधिकच वाढते. टेलिफोन बेल त्या शांततेचा भंग करते. नूतन फोन घेते.)

**नूतन :** हॅलो ! सॉरी. त्यांचं स्थळ रिकामं नाहीं. (हरिभाऊ आश्चर्यचकित होतात.) माझंच त्यांच्याशीं लग्न ठरलंय्. ( रिसीव्हर ठेवते. आणि कौतुकानें हरिभाऊंच्या जवळ येते. हरिभाऊ बाजूला सरतात, म्हणून मग ती रागावून बाजूला जाते.)

**हरिभाऊ :** मामा आहेत का घरांत ? ( ती बोलत नाहीं ) तुमचा बेत बदलला तर नाहीं ना ?

**नूतन :** नाहीं. पण माझा बेत बदलायच्या मात्र बेतांत मी आहें.



**हरिभाऊ हर्षे** – परीक्षेआधीच पेपर फुटला !

हरिभाऊ : कां ? ( उठतो ) मिस् झेलमच्या प्रकरणासंबंधीं तुम्हांला खरी हकीकत कळली का ?

नूतन : ( फुरंगटून ) हो–

हरिभाऊ : अहो, तें कांहीं खरं नाहीं.

नूतन : मग हा सूट काढा आधीं.

हरिभाऊ : ( घाबरून ) आणि—

नूतन : मला तो बोहारणीला द्यायचाय्.

हरिभाऊ : नको हो, एवढा हा एकच सूट आहे. म्हणजे एवढा हा एकच चांगला आहे.

नूतन : कां मिस् झेलमनं तुम्हांला तो भेट पाठविला आहे म्हणून त्याचा मोह सोडवत नाहीं ?

हरिभाऊ : भले ! कुणीं सांगितलं तुम्हांला हें ?

नूतन : पपांनीं–

हरिभाऊ : पपा गेले मसणांत–मामा–अहो मामासाहेब—

नूतन : अहो, त्यांना कशाला हांक मारताय् ?

हरिभाऊ : आतां त्यांच्या नांवानं हाका मारूं.नको तर काय करूं ? हा सूट चक्क मीं ४२ रु. १४ आण्याला विकत आणला आहे. ( बिल दाखवीत ) हें बिल—

नूतन : सॉरी ! पपांनीं मला थाप मारली असेल.

हरिभाऊ : आतां कसं बोललांत. तुम्ही कोणाला सांगूं नका पण जग त्यांना थापाड्यामामा म्हणूनच ओळखतं. ते कुणाला केव्हां काय थापा मारतील याचा नेम नाहीं. यांनीं मारलेल्या एका भयंकर थापेचा इतिहास पुढं–मागं मी तुमच्या कानावर घालणारच आहे. पण एकदां तुम्ही संपूर्णपणें माझ्या झाल्यावर !

नूतन : मी तुमची होणार हें ममीला वेणी आणतांना नव्हतं वाटतं लक्षांत ?

हरिभाऊ : खरं सांगूं का ? मीं ती वेणी तुमच्यासाठींच आणली होती. पण ममीसाहेबांच्या समोर तसं सांगायला मला लाज वाटली. ( लाजतो.

ताच बेल वाजते. त्रासून तो फोन घेतो. ) हॅलो ! सॉरी ! माझं लग्न आतां नक्की ठरलंय्. ऑ ? ( ओरडून ) माझं स्थळ रिकामं नाहीं.

**नूतन :** बाई–बाई–बाई–कमाल झाली बाई लोकांची. या लोकांनीं आपल्या लग्नाची बातमी अजून वाचली नाहीं वाटतं ?

**हरिभाऊ :** कां ती वाचूनच–आमची मुद्दाम चेष्टा करण्याकरितां हे लेकाचे फोन करताहेत. ( पुन्हां बेल वाजते आणि हरिभाऊ आतां चक्क रिसीव्हर खालीं काढून ठेवतात ) छे बुवा ! लग्न झाल्यावर या टेलिफोन कंपनीचं बिल भागवायचा माझा विचार बदललाच पाहिजे मला. तोडून टाकूं द्यात एकदां कनेक्शन.

**नूतन :** मिस् झेलमच्या घरच्या टेलिफोनचाहि तुम्हांला असाच त्रास होत असेल नाहीं ?

**हरिभाऊ :** अहो, तिचं नांव नका काढूं. मिस् झेलमचं कुणीं नांव घेतलं कीं मला गंगेंत जाऊन आंघोळ करून यावंसं वाटतं.

**नूतन :** आतां एकच विचारतें. तुमचं अन् तिचं कां बिनसलं हो ?

**हरिभाऊ :** जाऊं द्या हो. तिचं न् माझं कां बिनसलं याचा इतिहास ‘ हिंदुस्थानची फाळणी कां झाली ’ या इतिहासाइतकाच गुंतागुंतीचा आहे. अहो, ती काय बाई आहे ? मी रस्त्यानं जातांना आमच्यांत बाई कोण आणि बुवा कोण हें सुद्धां लोकांना ओळखायला पंचाईत पडायची. झेलम-शेजारीं मी म्हणजे झेलम नदीशेजारी आंबील ओढाच वाटायचा.

**नूतन :** इतकं होतं तर मग तुमचं जमलंच कसं हो ?

**हरिभाऊ :** तें तुमच्या पपांना विचारा.

**नूतन :** म्हणजे काय ? जमलं तुमचं अन् पपांना काय विचारा ?

**हरिभाऊ :** म्हणजे असं कीं तो अशुभ इतिहास या शुभ प्रसंगीं मला उच्चा-रायला लावूं नका. माझ्यावर तुम्ही विश्वास ठेवा. मुळांत तिचं माझं तसं कांहींच नव्हतं. किंवा असंच समजा ना– कीं मीं तिला जन्मांत पाहिलं-सुद्धां नव्हतं.

**नूतन :** खरं ? अगदीं खरं ?

हरिभाऊ : खरं– अगदीं खरं– खरोखरीच खरं–आईशप्पत खरं. हें घ्या वचन– ( तोंच घरांतून मामा आल्यामुळं दोघं बाजूला होतात. त्यांच्या हातांत बरेचसे फोटो असतात. )

मामा : टाळी द्या – ओ –माफ करा हं ! यापुढें दिवाणखान्यांत येण्यापूर्वी दरवाजाच वाजवायला हवा.

नूतन : ( लाजून ) चला– ( वर जाते )

मामा : ( फोनकडे पाहून ) हें काय ? तुमच्यामध्यें टेलिफोन बेलचा व्यत्यय येत होता वाटतं ? कां पुन्हां कनेक्शन तोडण्याची धमकी आली होती. [ रिसीव्हर जागच्या जागीं ठेवतात तोंच टेलिफोन कंपनीचा लाला येतो. ]

लाला : टेलिफोन बिल !

हरिभाऊ : देखो लालाजी, हम कलका सहसंपादक, आजका संपादक, और उद्यांका मामाका घरजांवई बोलता हूं ! कल सारा बिल ले जाव.

लाला : कल नहीं हमको अभीके अभी बिल चाहिये !

हरिभाऊ : अच्छा तो रातको आव– जाव – ( तो जातो. )

मामा : हरिभाऊ, टाळी द्या. ( ते हात मागं घेतात ) कां हो ? नूतनला वचन देतांना तुमचा हात शिवशिवत होता आणि आम्हांला साधी टाळी देतांना मात्र हात आखडतां घेतां ? हरिभाऊ हर्षे, दोनच दिवसांत तुमच्यांत बराच फरक पडलेला दिसतोय्. मला सांगायचं होतं तें इतकंच कीं– तुमच्या लग्नाचं नाटक मीं रचल्याबरहुकूम चाललंय् कीं नाहीं ?

हरिभाऊ : हो. तुमचं होतंय् नाटक पण आमचा जातोय् जीव—

मामा : मुळींच नाहीं. ज्याच्या अंगांत जीव नसेल त्याचा जात असेल जीव. त्यांतून–हरिभाऊ– इतर लग्नांत मुलीच्या मागं मामानं उभं राहायची चाल असते तर या लग्नांत मुलाच्या मागं हा मामा उभा राहणार आहे. बाकी आठव्या एडवर्डचं मिसेस् सिम्सनबरोबर लग्न जाहीर झाल्यावर तिला मिळाली नसेल त्याच्या दसपट प्रसिद्धि मिस् झेलमचं तुमच्यावर प्रेम होतं– या बातमीनं तुम्हांला मिळालीय्. जीते रहो जीवा ! आजवर प्रसिद्ध पुरुषांच्या आयुष्यांत अप्रसिद्ध स्त्रिया आल्याचीं अनेक उदाहरणं असतील, पण प्रसिद्ध स्त्रीच्या आयुष्यांत अप्रसिद्ध पुरुष आल्याचं हें पहिलंच उदाहरण असेल. ( शंखनाद येतो. )

**शंखनाद :** मामासाहेब– गौरीबाई गोवेकर– छापखान्यांत– आल्या आहेत. तुम्हांला त्यांनीं बोलंवलंय्. कांहींतरी सिरियस आहे म्हणतात.

**मामा :** हं ! पातळांसाठीं आली असेल ती बया.

**हरिभाऊ :** गौरीबाई गोवेकर कोण ?

**मामा :** मागाहून सांगेन. गरीब आहे बिचारी—

**शंखनाद :** गरीब बरी असेल. पार्सलांत चांगलीं जार्जेटचीं पातळं होतीं कीं !

**मामा :** अहो, जरा गप्प बसा कीं.

**हरिभाऊ :** हं. कांहींतरी भानगड दिसतीय्.ममीसाहेबांना माहीत आहे का हें !

**मामा :** अहो, या शंखांनं सगळा घोटाळा केला आहे. परवां रात्रीं मी–ती आणि हे विद्वान् एका पार्टीला गेलों होतों. घरीं आल्यावर तिचीं पातळं गाडींत विसरलीं होतीं तर या शंखांनीं तीं चक्क आमच्या कुटुंबाच्या हातांत नेऊन दिलीं.

**हरिभाऊ :** पण मामासाहेब, परक्या बाईबरोबर तुम्हीं आधीं पार्टीलाच जायला नको होतं. त्यामुळें नीतिमत्तेला कलंक लागतो. संसारसुखांत व्यत्यय येतो.

**मामा :** हें तुम्ही मला सांगतांय्– मिस् झेलमवर प्रेमाचा वर्षाव करतांना तुम्हीं केला होता का याचा विचार !

**हरिभाऊ :** पण आपण तें लफडं सरळ सरळ नूतनला सांगितलं नाहीं का ? तसं तुम्ही ममीसाहेबांना हें चक्क सांगून कां टाकीत नाहीं ? नवऱ्यानं बायकोपासून कांहींहि लपवून ठेवूं नये.

**मामा :** अहो, पण तिचं न् माझं कांहींच नाहीं तर सांगूं काय कपाळ ? ती मला तर–मामा म्हणते.

**हरिभाऊ :** मग ! आम्ही तुम्हांला मामा म्हणतों. शिवाय मामासाहेब, ज्या कार्यांत स्त्री शिरते त्या कार्याचं लवकर वाटोळं होतं असं परवांच मीं कुठं तरी वाचलंय्.

**शंखनाद :** छान– ! असल्या मूर्ख लिखाणावर विश्वास ठेवणारा माणूस मुलाखत घेण्याच्याच लायकीचा असला पाहिजे. ( वही काढून ) बोला– मिस् झेलम तुम्हांला कुठं भेटली !

हरिभाऊ : ( त्रासून ) मसणांत—
शंखनाद : ( लिहितो ) मिस् झेलम एका प्रशांत सायंकाळीं मला मसणांत भेटली–
हरिभाऊ : अहो बातमीदार आहांत कीं कोण आहांत ? यापुढं झेलमच्या बाबतींत एक अक्षरहि आपल्या 'टिमकीं'त मी छापूं देणार नाहीं.
मामा : पण मी छापूं देईन ना. शंखनाद–मी सांगतों–लिहून घ्या.
शंखनाद : हरकत नाहीं. मुलाखत तुम्ही द्या–नांव यांचं छापतों.
हरिभाऊ : म्हणजे !
शंखनाद : म्हणजे काय ? मुलाखती या अशाच असतात. आपण ज्या नटींच्या मुलाखती म्हणून छापतों ना–त्या बहुश: त्यांच्या नवऱ्यांनीं अगर त्या नटींनीं पाळलेल्या लेखकांनींच दिलेल्या असतात. बोला, मिस् झेलम दिसायला कशा आहेत ? म्हणजे पडद्याबाहेर–
हरिभाऊ : मीं त्यांना अजून पाहिलेलेंसुद्धां नाहीं.
शंखनाद : ( लिहितो ) मिस् झेलम या तिलोत्तमा–रंभा आणि उर्वशी यांच्या सौंदर्याचा गाळीव अर्क असून, तुम्हीं त्यांना पाहिलेलं नाहीं ना– हं–इतकं सौंदर्य मीं अजून कुठं पाहिलेलंसुद्धां नाहीं.
मामा : वा शंखनाद ! तुमच्यासारखे मुलाखते असले म्हणजे प्रत्यक्ष मुलाखत घेण्याची जरूरच नाहीं कीं !
शंखनाद : हो ना. ता म्हणतां ताक आणि ता. क. म्हणतां ताजा कलम–हे– ओळखण्यांतच माझा सारा जन्म गेला आहे. एकदां एका मोठ्या शेठजीची मी मुलाखत घ्यायला गेलों होतों. मी पोर्चमध्यें जाऊन पोहोंचतों तों त्याचं कुत्रं जें माझ्या मागं लागलं तें थेट मीं रस्त्यापर्यंत धूम ठोकली. पण त्याची मुलाखत छापल्याशिवाय राहिलों काय ?
हरिभाऊ : म्हणजे त्या शेठजींची कीं कुत्र्याची ?
शंखनाद : शेठजींची हो. मीं चक्क छापलं कीं–मशारनिल्हे शेठजी बाहेरून रागीट दिसत असले तरी ते आंतून अत्यंत प्रेमळ आहेत. त्यांची देहयष्टि अल्सेशन कुत्र्याप्रमाणें ठणठणीत असून इतक्या उतारवयांतहि ते पळण्यांत फार चपळ आहेत. मी त्यांच्याकडं गेलों तेव्हां ते आपल्या लाडक्या कुत्र्यांबरोबर शिवाशिवीचा खेळ खेळत होते.

**हरिभाऊ :** मग ती मुलाखत वाचल्यावर धांवत येऊन त्यांनीं तुमची मानगूट पकडली कीं नाहीं ?

**शंखनाद :** छे–छे–मला तर ते स्वतः दारापर्यंत पोहोंचवायला आले होते. तुम्ही बोला पुढं. किंवा नाहीं बोललांत तरी उद्यां तुमची मुलाखत आम्ही छापणारच ! ( बाहेर बॅन्ड वाजूं लागतो. सर्वांचं लक्ष तिकडं वेधतं. शंखनाद झटकन् खिडकींतून पाहतो ) अँ ! मिरवणूक दिसतेय् कसली तरी. मिळविलीच पाहिजे बातमी ( धांवत जातो ).

**हरिभाऊ :** मामासाहेब–मला वाटतं–यापुढं आपण मिस् झेलमबद्दल बाहि काढूं नये हें उत्तम !

**मामा :** नाहीं–नाहीं–हरिभाऊ–तुमचं एकदां लग्न लागतो नूतनपुढं हें मिस् झेलमचं बुजगावणं कायम ठेवलंच पाहिजे. नाहींतर तिचं मन एखाद्या वेळेला बदलायचं. ( कानांत सांगतो ) आणि म्हणूनच तिला जळीं स्थळीं झेलमचा साक्षात्कार होण्यासाठीं मी त्या झेलमच्या फोटोच्या या प्रतीच काढून आणल्या आहेत.

**हरिभाऊ :** ( फोटो पाहून ) बापरे ! मामासाहेब या प्रती पाहून नूतनलाच काय, पण मलाहि झेलमचा साक्षात्कार व्हायला लागलाय्. झेलमचं सौंदर्य आणि त्यावरचा हा 'मेरे प्यारे हरि' चा मजकूर पाहून वाटतं कीं जावं अन् सरळ हिच्याशीं लग्नच लावून यावं. पण दुसऱ्या क्षणीं वाटतं कीं ही थाप आहे–हें स्वप्न आहे.

**मामा :** पण या थापेनींच–या स्वप्नांनींच तुमचं भाग्य उजळणार आहे. हा फोटो इथं टेलिफोनजवळ ठेवूं या. हा इथं रायटिंग टेबलवर–हा इथं–[ आणि साऱ्या घरभर मामा झेलमचे ते फोटो ठेवतात. ]

**हरिभाऊ :** मामासाहेब–एखाद्या आरसेमहालांत शिरल्यावर जशीं आपलीं हजारों प्रतिबिंबं दिसतात त्याप्रमाणें हे फोटो पाहून वाटतं कीं मिस् झेलमच एखाद्या आरसेमहालांत शिरली असावी.

**शंखनाद :** ( प्रवेशून–फोटो पाहून हतबुद्ध होऊन ) बाप रे ! (लिहितो) मिस् झेलमनीं ( १० फोटो मोजून ) सुमारें ३०० फोटो हरिभाऊ हर्षे यांना भेट म्हणून पाठविले आहेत.

हरिभाऊ : ए, आतां मारीन मुसकुटांत. फोटो पाहिले—म्हणे झेलमनीं भेट पाठवली आहे. उद्यां झेलम येणार म्हणून मुद्धां छापशील तूं.

शंखनाद : छापशील म्हणजे ? छापणारच. हें काय– ( ३–४ हॅन्डबिल्स दाखवतो. ) वाचा– आज रात्रौ रेनबो टॉकीजमध्यें जादु–इ–कत्तलच्या सिल्व्हर ज्युबिलीप्रसंगीं त्या बोलपटाची नायिका– प्रसिद्ध स्टट– क्वीन– सिनेमासम्राज्ञी मिस् झेलम यांचा सत्कार. अध्यक्ष– ‘ टिमकीचे ’ नूतन संपादक हरिभाऊ हर्षे–

हरिभाऊ : ( घाबरून ) काय ? मी अध्यक्ष ? मामा,—मेलों– पेटलों– जळून खाक झालों.

शंखनाद : ( लिहितो ) मिस् झेलम येणार ही बातमी ऐकून हरिभाऊ हर्षांचा हर्ष त्यांच्या हृदयगगनांत मावेना–

हरिभाऊ : ए– आतां इथून गेला नाहींस तर खरोखरीच गगनांत पाठवीन तुला.

शंखनाद : हो– हो. शेवटीं हरिभाऊ हर्षांनीं मला प्रेमानीं निरोप दिला. ( धावतां धावतां ) वा– वा– उद्यांची ‘ टिमकी ’ चुटकीसरशी उडणार ! निदान आमचे पगार नक्की आणि वेळेवर मिळणार ! ( आनंदानं जातो. )

हरिभाऊ : ( रागावून ) माझ्या अध्यक्षतेखालीं त्या बयेचा सत्कार ? थांबा– त्या रेनबो टॉकीजच्या मालकावर अब्रुनुकसानीची फिर्यादच ठोकतों. कुठल्या गाढवानीं माझं नांव छापायला परवानगी दिली ?

मामा : मी– तो अगदीं मागंच लागला माझ्या.

हरिभाऊ : होय का ? आतां मात्र कहर झाला. अहो, ही थाप तिच्या कानावर गेली तर ?

मामा : कोण जातंय् तिला कळवायला ? बाकी ती येतीय् हें एकपरी बरंच झालं. नूतनला वाटेल कीं आपल्या माजी प्रियकराला भेटायलाच मुद्दाम ती येत असावी.

हरिभाऊ : अहो होय.—पण खरोखरीच ती मला भेटली तर ! लग्न नको नटी आवर—असं होऊन जायचं ना ! म्हणजे आयण करायला गेलों एक अन् झालं भलतंच–असं व्हायचं. छे ! छे ! त्यापेक्षां नूतनचं अन् माझं लग्न आजचे आज व्हावं हें उत्तम. नाहींतर तेलंहि जायचं, तूपहि जायचं अन्

हातीं धुपाटणं मात्र यायचं. ( तोंच बाहेरून आरडाओरडा ऐकू येतो. झेलमचा प्रियकर प्रसिद्ध फ्री–स्टाइल चॅम्पीयन झारासिंग नीतिनसह ओरडत येतो. )

**झारासिंग :** (पडद्यांत) बताओ। बताओ। मैं उसका खीमा कर दूंगा, हड्डी पसली एक करूंगा, मैं ऐरागैरा नहीं। ( प्रवेशून ) मैं झारासिंग हूं, फ्री–स्टाइल का वर्ल्ड चॅम्पीयन हूं, खारासिंगकी औलाद हूं –बारासिंगका पठ्ठा हूं, और प्यारासिंगका उस्ताद हूं। कहाँ है वो कम्बख्त हर्षा ?

**नीतिन :** मामासाहेब, यांची ओळख यांनीं तुम्हांला करून दिलीच आहे. झारासिंगजी, यही है वो हर्षा–

**हरिभाऊ :** हरिभाऊ हर्षे– सहसंपादक– टिमकी. हे काय माझ्याशीं फ्री-स्टाइल कुस्ती– खेळायला आले आहेत काय ?

**नीतिन :** तें आतां बघाच कीं. मिस् झेलमचे हे–

**झारासिंग :** मिस् झेलम मेरी फ्री-स्टाईलपर फिदा हो गयी। वो मेरी फ्रीस्टाईलइपर जान कुर्बान करती हैं। और मैं उसके ॲक्टींगपर दिल निछावर करता हूं। तडपता हूं।

**हरिभाऊ :** मग आपण हल्लीं फ्री–स्टाईल कुस्ती सोडलीच असेल ? (तो अंगावर येतो ) मराठी समजतंय् वाटतं यांना ?

**झारासिंग :** हाँ–हाँ–लेकिन थोडा थोडा समजता हूं–बोल नहीं सकता। आपने क्या पूछा ?

**हरिभाऊ :** नाहीं. म्हटलं हल्लीं फ्री-स्टाईल छोड्या क्या ?

**झारासिंग :** नहीं, नहीं, हरगीज नहीं–। जान जायेगी फिर फ्री-स्टाईल नहीं छोडूँगा। अभी मैं, ताडीवाला होटलमें फ्री-स्टाईलकी मिहनत कर रहा था– इतनेमें इसीने आकर मुझसे कुछ कहा। वहीं मुझे यहाँ ले आया।

**मामा :** मिस् झेलमबाई आल्याच असतील ?

**झारासिंग :** आयी है। हमारेहि साथ आयी है। हवाई जहाजसे। मैं तो उसे कभी अकेली नहीं छोडता। मैं बहुत जादा जलता हूं। ये मैं बरदास्त नहीं कर सकता। परदेपर भी जब कोई हीरो झेलमसे मुहब्बत करता है तब मेरे हाथ सनसनाते हैं। आजहि हवाई अड्डेमें कोई उसकी



**हरिभाऊ हर्षे** – मामा, मामा मला वांचवा !

ऑटोग्राफ माँगने आया था। यूं पकडी उसकी गर्दन। कम्बख्त, कौन जाने अब जिन्दा है या नहीं।

**हरिभाऊ :** अभी तक वो मराच होगा।

**नीतिन :** झारासिंग—तुम्हीं पूर्वी काय केलं होतं हें सांगण्यापेक्षां आतां काय करणार आहांत तें बोला ? तुमच्या झेलमचं या हर्षावर प्रेम होतं.

**झारासिंग :** क्या कहाँ ? तो इस बहाने झेलम यहां आयी ? अच्छा तो उसेभी मेरे फ्री-स्टाईल बताऊं, आखीर मेरा नाम तो झारासिंग है। खारासिंगकी अवलाद हूं—बारासिंगका पठ्ठा हूं—और प्यारासिंगका उस्ताद हूं।

**मामा :** बरं—बरं—बरं. तुम्ही आमच्या कारासिंगाचे चिरंजीव का ?

**झारासिंग :** कारा नहीं खारा—

**मामा :** हो, हो खारासिंग. खारासिंग आतां थकले असतील नाहीं.

**झारासिंग :** दस साल हुए वे स्वर्ग सिधारे।

**मामा :** अरे अरे वाईट झालं. तुमचा हा पराक्रम पाहयला ते जिवंत असायला हवे होते. बसा.

**झारासिंग :** मैं यहां बैठनेके लिये नहीं आया—बोलो हर्षा ?

**हरिभाऊ :** ( बोबडी वळून ) मैं क्या बोलूं ? ये मामाच बोलेगा. वो भी एक थापाका फ्री—स्टाईल चॅम्पीयन है।

**झारासिंग :** मेरा उसे क्या वास्ता ? मैं तुमसे पूछता हूं. किसीकी डर है ?

**मामा :** मी सांगतों. यांची झेलमबाईबरोबर पूर्वी भानगड होती.

**झारासिंग :** ( गर्जून ) क्या बोला ?

**हरिभाऊ :** मैं कुठं काय बोला ? बोला मामाच.

**झारासिंग :** क्या मुझसे झूट बोलनेकी हिम्मत ?

**मामा :** अहो, ओरडूं नका. जरा दमानं घेतलंत तर सारी हकीकत मी तुम्हांला सांगेन. नाहींतर तुम्हीं, तुमची झेलम, हे हरिभाऊ—अन् तुमची फ्री-स्टाईल ( जाऊं लागतो. )

**हरिभाऊ :** ( मामांचे पाय धरून नारायणराव पेशव्यांच्या आवेशांत ) नका हो ! मामासाहेब, या राक्षसाच्या तावडींत मला देऊन जाऊं नका हो! मामा—मामा—मला वांचवा. नारायणराव पेशव्याप्रमाणं हा हरिभाऊ हर्षे

तुमच्याकडं जीवदान मागतोय् हो. ममीसाहेब कहीं आनंदीबाई पेशव्यां-सारख्या दुष्ट नाहींत. त्यांना बोलवा. त्याहि सांगतील कीं तुमच्या या कालच्या सहसंपादकाला—आजच्या संपादकाला—आणि उद्यांच्या घरजांवयाला जीवदान द्या. ( हंबरडा फोडून ) ममीसाहेब—

**मामा :** जा, तुम्ही मरा जा. ( पुन्हां जाऊं लागतो. )

**हरिभाऊ :** ( पुन्हां अडवून ) नका हो. मामा—मला वांचवा. मला नूतन नको. नोकरी नको. कांहीं नको. पण मामा—मामा हा फ्री-स्टाईल सुमेरसिंग गारदी माझा खूनहि करील हो.

**झारासिंग :** ( त्याचं बखोटं धरून ) मेरा नाम सुमेरसिंग नहीं, झारासिंग है। सच बताओ, ये क्या मामला है ?

**हरिभाऊ :** कांहीं नाहीं हो. तुमची झेलम काळी का गोरी आहे—

**झारासिंग :** गोरी है—आगे बतावो—

**हरिभाऊ :** असेल. पण मीं तिला पाहिलंसुद्धां नाहीं हो.

**झारासिंग :** क्या ! झेलम जैसी मशहूर अक्ट्रेसका एक भी पिक्चर नहीं देखा?

**हरिभाऊ :** देखा देखा. पिक्चर देखा लेकीन प्रत्यक्ष नहीं देखा।

**मामा :** म्हणजे घी देखा लेकिन बडगा नहीं देखा—असंच ना ?

**हरिभाऊ :** मामा—माझं इकडं पेटलंय् रोम आणि तुम्ही तिकडं विनोदाचं फिडल कसलं वाजवतां आहांत ?

**नीतिन :** काय हो ? तुम्ही तिला पाहिलं नाहीं म्हणतां मग हे इतके फोटो इथं कसे आले ? ( एक फोटो झारासिंगाला दाखवीत ) देखोजी—इसपर क्या लिख्खा है ? पढीये—

**झारासिंग :** आपहि पढकर बताइए—मैं पढना नहीं जानता—मैं पेहेलवान हूं विद्वान नहीं !

**नीतिन :** तो सुनो ' मेरे प्यारे हरि—तुम्हारी झेलम. '

**हरिभाऊ :** नाहीं हो. तुम्हारीच झेलम. मामा, सांगा ना यांना, नाहींतर मीच सांगतों—( स्पष्टपणें ) झारासिंग, हा मजकूर यांनीं लिहिला.

**मामा :** मुळींच नाहीं. ' मेरे प्यारे हरि ' हा मुद्रणदोष आहे. फ्री-स्टाईल कुस्तींत फाउलसना जितकी किंमत असते तितकीच वृत्तपत्र-सृष्टींत मुद्रण-दोषांना किंमत असते.

झारासिंग : ए क्या बकते हो ! हमें फाऊल करनेकी आदत नहीं–खारासिंगकी अवलाद हूं-वारासिंगका पठ्ठा हूं-प्यारासिंगका उस्ताद हूं. समझे ?

नीतिन : ये बोलते हैं कीं यह Printer's devil याने ये गलत लिख्खा है ।

मामा : होय. माझं स्वत:चें वर्तमानपत्र असल्यामुळं माझ्याकडे बरेचसे फोटो छापण्याकरतां येतात. हा पाहा—

झारासिंग : ये कौन खूबसुरत औरत है ?

हरिभाऊ : ये औरत नहीं मर्द है ? बालगंधर्वका यंग जमानेका रुक्मिणीका फोटो है ये । मानो ये हमारा इस्टेजका झारासिंग है ।

मामा : हा दुसरा–नूरजहानचा.

हरिभाऊ : ही मरून ३०० वर्षें झालीं.

मामा : त्याप्रमाणेंच हा मिस् झेलमचा फोटोहि आमच्याकडं छापायला आला होता.

नीतिन : एक फोटो छापायला इतके फोटो लागतात ?

मामा : ते सगळे रेनबो टॉकीजच्या मालकांनीं धाडलेत.

नीतिन : विचारूं का मालकांना फोन करून ?

मामा : विचारा. पण आमचा फोन नादुरुस्त आहे, आणि या फोटोवरच्या मूळ मजकुरांत 'मेरे प्यारे झारा' असंच लिहिलं होतं.

नीतिन : मग झाराचा हरि कसा झाला ?

मामा : गोखल्यांचे रास्ते कसे झाले ?

नीतिन : मला माहीत नाहीं.

मामा : मग हेंहि मला माहीत नाहीं.

नीतिन : ठीक आहे. मिस् झेलमचं अन् या हर्षाचं कांहीं नव्हतं ना ? मग नूतनला बोलवा.

झारासिंग : नूतन—? ये नूतन कोन है ?

नीतिन : यांची मुलगी. तिला माझ्याशीं लग्न करायचं होतं. पण झेलम आणि हरिभाऊंच्या भानगडीच्या बातमीनं ती यांच्याकडे आकर्षली गेली. यानंच तिला पळवली–पटकावली. पचवली कीं नाहीं तें मला अजून माहीत नाहीं. म्हणून खरा प्रकार काय आहे तें विचारण्यासाठीं मी मिस् झेलमला

भेटायला आलों तर तुमची गांठ पडली. पुढचा प्रकार तुम्हांला माहीतच आहे.

झारासिंग : अच्छा ! तो चलो मेरे साथ ! इस झमेले का फैसला झेलमके सामने कर दूं !

हरिभाऊ : ( लांबूनच ) येत नाहीं आम्ही. फ्री-स्टाइल कुस्तीगीर झाला म्हणून काय त्याला गुंडगिरीचा लायसेन्स मिळाला काय ?

झारासिंग : अच्छा–तो आप वहा नहीं आते तो मैं उसेहि यहाँ खींच लाता ! महंमद पहाडकी तरफ ना चले तो पहाडही महंमदकी तरफ लाता हूं. मैं वारासिंगका पठा हूं, और प्यारासिंगका उस्ताद हूं ।

हरिभाऊ : जा–जा–मीहि इर्षोंच्या घराण्यांतला आहे. आणि या मामांचा पट्टा आहे.

शंखनाद : ( प्रवेशून, हरिभाऊंना साष्टांग नमस्कार घालीत ) आणि माझे गुरु आहांत. वा गुरु ! मघांपासून त्या मिस् झेलमनें आपल्या छापखान्यांत शंभरदां फोन केला असेल. वा वा ! मिस् झेलमसारख्या प्रसिद्ध स्टंट– क्वीनच्या ओठांचा कधीं– काळीं टेलिफोनशीं इतका जवळचा संबंध येणार आहे, हें मला जन्मापूर्वी कळतं तर देवापाशीं मी हट्ट धरून बसलों असतों कीं ' देवा, मला माणूस करण्याऐवजीं टेलिफोन कर. ' (बेल वाजते. हरिभाऊ फोन घेतात. )

हरिभाऊ : ( फोनमध्यें ) मामा बाहेर गेलेत.

झारासिंग : क्या बोला ?

शंखनाद : हे कोण ?

मामा : झेलमचे प्रियकर.

शंखनाद : माजी कीं आजी ?

हरिभाऊ : मा–

मामा : आजी.

शंखनाद : वा वा ! मग यांची मुलाखत तर मुखपृष्ठावर टाकण्याइतकी महत्त्वाची आहे. ( वही काढतो ) बोलो झेलमकी कितनी उम्र होगी ?

**झारासिंग** : आबे बेवकूफ– औरत के उमरपर कभीं मोहब्बत की जाता है ? वो एक परी है । फ्री-स्टाईल है ।

**शंखनाद** : ( लिहितो ) मिस् झेलम या एक सुप्रसिद्ध फ्री-स्टाईल कुस्तीगीर असून–

**झारासिंग** : ओ– ( वही फाडून जातो. )

**नीतिन** : ( जातां जातां ) आमची घेतां का मुलाखत ?

**शंखनाद** : ( त्याच्या बायकीपणाची नक्कल करीत ) आमच्या अंकांत जागा नाहीं. फक्त महिला–पान शिल्लक आहे. ( नीतिन रागानं जातो. )

**मामा** : शंखनाद, तुमची वही फाटली तरी अजून तुमचं मुलाखतीचं वेड कांहीं गेलं नाहीं. तुम्ही मूठभर आल्यागेल्याजवळ अशा मुलाखती मागूं लागलांत आणि मी त्या छापूं लागलों तर दर 'टिमकी'चा अंक मला ' खास मुलाखत अंक ' च काढावा लागेल.

**शंखनाद** : ( लिहितो ) मामांचा मुलाखतींना मज्जाव–

**हरिभाऊ** : होय. तूर्त तुमचं हें मुलाखत प्रकरण बाजूला ठेवा. तो फ्री-स्टाइल घटोत्कच त्या मिस् झेलमचं हरण करून तिला इथं घेऊन येणार आहे.

**शंखनाद** : उत्तम ! ( लिहितो ) सुप्रसिद्ध फ्री-स्टाईल चॅम्पीयन झारासिंग यांना हरणं अतिशय आवडतात. व त्यांना कांहींच खायला नसलं म्हणजे ते हरणं मारून खातात.

**हरिभाऊ** : अहो, ते हरणं खात नसून मिस् झेलमला ते इथं घेऊन येणार आहेत.

**नूतन** : ( प्रवेशून ) त्या मिस् झेलमला या घरांत पाऊल तर टाकूं दे, तिच्या झिंज्या धरून तिला बाहेर नाहीं काढली तर मी मामांची मुलगीच नव्हे.

**शंखनाद** : मिस् झेलम Versus मिस् नूतन ही फ्री-स्टाईल कुस्ती लवकरच होणार. तारखेकडे लक्ष ठेवा.

**हरिभाऊ** : ए, आतां इथून जातोस का तूं लोकांच्या मुलाखती छापण्याऐवजीं मीच तुझा मृत्युलेख छापायची पाळी आणूं ?

**शंखनाद** : ( लिहितो ) शंखनाद यांचा मृत्यु. ( कागद चुरगाळून) छे छे ! या बातमींत लोकांना कांहींच इन्टरेस्ट नाहीं.

**नूतन** : पपा, मला एक सांगा ? खरंच या घरांत मिस् झेलम येणार आहे ?

**मामा** : कां ? आतां कां ? हजारों स्त्रियांनीं ज्याच्यावर प्रेम केलंय् अशा पुरुषाशीं तूं लग्न करणार होतीस नाहीं ना ? मग हरिभाऊंच्या पहिल्या प्रेमप्रकरणाच्या पहिल्या पानालाच कां घाबरतेस ?

**हरिभाऊ** : हा त्या तुमच्या नाच्याचा गाढवपणा. तोच त्या फ्री-स्टाईल रावणाला इथं घेऊन आला.

**नूतन** : कोण तो ?

**शंखनाद** : मला विचारा. हा जिवंत बातमीदार तुमच्यापुढें उभा असतांना बातमीसाठीं तुम्ही दुसऱ्याच्या तोंडाकडे कां बघतां ? तो म्हणजे मिस् झेलमचा प्रियकर–मारासिंग—

**हरिभाऊ** : मारासिंग नाहीं झारासिंग.

**मामा** : एकच. अंगानें आहे लेकाचा शेकाट्यासारखा. ( दोघंहि आश्चर्यचकित होतात. )

**शंखनाद** : शेकाटयासारखा ? मामासाहेब मालवणकर यांची दृष्टि बिघडली असून—

**मामा** : गप्प बसा हो. हिला एकदां प्रत्यक्ष तो दिसूं दे ना. मग पाहूं या–ही झेलमच्या झिंज्या धरते का तो हिचा बॉबकट करतो.

**हरिभाऊ** : नाहीं– नाहीं. मामासाहेब, तो हिच्या केंसाला धक्का लावूं लागला तर मीच त्याच्या डोक्यावर एक केस ठेवूं देणार नाहीं. तुम्ही मला नाना फडणीसासारखा नुसता लेखणीबहाद्दर समजूं नका. या हरिभाऊला नाना फडणीसांच्या लेखणीच्या धारेचं, आणि महादजी शिंद्याच्या तलवारीच्या धारेचं बाळकडूच मिळालं आहे.

**शंखनाद** : काय हो ! तुमचा राक्षसगण आहे काय ?

**हरिभाऊ** : मला माहीत नाहीं. माझा रानांत जन्म झाल्यामुळें माझी कुंडली करायचं राहून गेलंय्.

**नूतन** : पण मला मात्र तुमची कुंडली अथपासून इतिपर्यंत पाठ झालीय्. तुम्ही दिसतां तसे नाहीं.

**शंखनाद** : दिसतं तसं नसतं म्हणूनच जग फसतं.

**नूतन** : होय. शंखनाद, माझी मुलाखत घ्या.

शंखनाद : पण त्याच्या आधीं मला एक कागद द्या. अहो, मुलाखतीच्या बाबतींत ' अनंत हस्तें कमलावरानें । देतां किती ? घेशील दो–नाहीं एकच करानें, ' असं माझं तत्त्व आहे—

नूतन : हरिभाऊंसारखा मनाचा खंबीर मनुष्यच बायकांना आवडतो. नीतिनसारख्या कच्च्या दिलाच्या पुरुषावर कुणीहि शहाणी स्त्री प्रेम करणार नाहीं. ( फोनची बेल वाजते. मामा फोन घेतात. )

मामा : हॅलो ! टेलिफोन ऑफि– रेनबो टॉकीज ?

हरिभाऊ : ( घाबरून उठत ) काय म्हणतोय् ?

मामा : मिस् झेलमची आणि हरिभाऊंची बॉक्समध्येंच बसायची व्यवस्था केलीय् ? ( हरिभाऊ घामाघूम होतो. )

नूतन : ( मामांच्या हातून रागानं फोन घेऊन ) हॅलो ! हरिभाऊ येऊं शकणार नाहींत. कां ? त्यांच्या पाठींत उसण भरलीय्. ( हरि खरोखरीच पाठींत उसण भरल्यासारखं करतो ) त्यांची पाठ शेकूं ? बरं बरं– तुम्ही कोण सांगणार ? ( रागानें फोन ठेवते. )

ममी : ( प्रवेशून ) अग बाई ! कोण कुणाची पाठ शेकणार ?

शंखनाद : या बातमीदाराला विचारा. आपल्या कन्या– या हरिभाऊंची पाठ शेकणार—

ममी : कां ? दोघांचं भांडणबिंडण झालं काय ?

मामा : नाहीं. हरिभाऊंच्या पाठींत उसण भरलीय्.

ममी : अग बाई हो ! मग चला मीच शेकतें तुमची पाठ.

मामा : कशाला ? तो फ्री–स्टाईल झारासिंग येतोच आहे कीं यांची पाठ शेकायला.

ममी : तुमचं आपलं कांहीं तरीच ! तो कोण शेकणार ? म्हटलं मी कांहीं हातांत बांगड्या नाहीं भरल्या. नूतन, तूंहि चल ग. आपण दोघी यांची पाठ शेकूं. ( तिघं जातात. )

शंखनाद : मामा–मी जाऊं का आंत ?

मामा : कशाला ?

**शंखनाद :** हरिभाऊंच्या पाठ—शेकणीसमारंभाची गरमागरम बातमी प्रथम मिळवायला. ' टिमकी 'चा ' अंक चुटकीसरशी खपेल. निदान आमचा पगार तरी वेळच्या वेळीं मिळेल.

**मामा :** टिमकी गेली जहन्नममधें, पगार घाला चुलींत आणि तुम्ही बसा इथं. मलाच तुम्हाला एक झणझणीत मुलाखत द्यायची आहे.

**शंखनाद :** द्या कीं— आंधळा मागतो एक डोळा अन् देव देतो दोन—

**मामा :** मात्र एक अट ! ही मुलाखत नूतनच्या लग्नानंतर छापायची. नाहींतर कराल सारा विचका. लिहा, " नूतनसारख्या स्वतःला भयंकर आधुनिक समजणाऱ्या आणि लग्नाबद्दलच्या चमत्कारिक कल्पना उराशीं बाळगणाऱ्या उपवर कन्यकांना धडा देण्यासाठींच मीं हें नाटक चालूं ठेवलंय्. हरिभाऊ आणि झेलम यांच्या प्रकरणाची मीं थाप मारली ती यासाठींच—"

**शंखनाद :** म्हणजे ? ती थाप आहे काय ? म्हणजे माझ्या मुलाखतीचं मोठंच सेन्सेशन नाहींसं झालं.

**मामा :** होय. आणि तुमच्यासारख्या बातमीदारांनाहि मला हेंच सांगायचंय् कीं, निव्वळ सेन्सेशनच्या मागं लागून सत्याचा अपलाप करणाऱ्या बातम्या छापण्याचं यापुढं सोडून द्या. कारण ' दिसतं तसं नसतं ' हें तुम्ही मघांशीं तुमच्या वहींत लिहून घेतलेलंच आहे. ( बाहेर आरडाओरडा – झारासिंग झेलमला ओढून आणीत असावा असें त्याच्या शब्दावरून वाटतें. )

**झारासिंग :** (पडद्यांत) झेलम अभी तुझे बताता हूं । ( नीतिनसह झेलमला घेऊन प्रवेशून ) यह रही हमारी झेलम—हमारी परी—हमारी फ्री—स्टाईल. अब बोलिये ।

**शंखनाद :** मी शंखनाद. 'टिमकी'चा बातमीदार—मुलाखत्या—आणि सर्व कांहीं. आपण मला मुलाखत दिलीत तर हवी आहे.

**झेलम :** I see ! तो मुलाकातके लिये मुझे यहां लाया गया है ? फिर प्यारा झारा—इसलिये जबरदस्ती लानेकी क्या जरूरत थी ? मैं ही चली आती ।

झारासिंग : ठहरो. सब बताता हूँ । लेकिन झेलम सबसे पहिले ये तेरी जुबान से कह दो—क्या तेरी मुहब्बत सच्ची है ? तुम मुझसे सच्ची मुहब्बत करती हो ?

झेलम : दिलोजानसे !

झारासिंग : और तेरा दूसरा कोई सनम नहीं—दूसरा कोई आशीक नहीं ?

झेलम : झारा—प्यारे झारा—ए क्या बत्तमीजी है ? सबकी हद्द हो गयी—तुझे किसने कहा ?

झारासिंग : इसीने कहा—

नीतिन : होय. हें साऱ्या गांवांत झालंय्. आज रात्रीं त्यांच्या अध्यक्षतेखालीं तुमचा सत्कार होणार आहे.

झेलम : साऱ्या गांवांत झालंय् कीं माझा एखादा प्रियकर या गांवांत आहे म्हणून ?

झारासिंग : जी हाँ ! मेरे ख्यालसे तूने इसी बहाने रेनबो टॉकीजकी ऑफर स्वीकार ली । ( ती हंसते. ) झेलम—ये हंसी मजाककी बात नहीं—ये बडा पेचीदा मामला है ।

झेलम : अच्छा ! मग माझ्या प्रियकराचं नांव तरी मला कळूं दे.

शंखनाद : मी सांगतों त्याचं नांव— हरिभाऊ हर्षे.

झेलम : हरिभाऊ हर्षे ? छान् ! अहो, माझ्या प्रियकराचं नांव तरी चांगलं हुडकून काढायचं होतंत ?

मामा : झेलमबाई— 'नांवांत काय आहे ? ' — असं शेक्सपिअरसाहेब बोलून गेलाय्. पण तें आपल्या गांवीं नसणं साहाजिक आहे.

झेलम : मला वाटतं शेक्सपिअरसाहेबांच्या वेळेला सिनेमे निघाले नसले पाहिजेत. आज जर ते असते तर— 'नांवांत काय नाहीं ! '— असंच लिहून ठेवलं असतं त्यांनीं. आतां हेंच पाहा ना. या गांवांत माझा प्रियकर आहे अशी अफवा उठवल्यामुळेंच हें साऱ्या गांवांत झालं. पण एखाद्या झाडुवालीचा प्रियकर या गांवांत आहे अशी अफवा उठवली गेली असती तर तिकडं एखाद्या मुकादमानंहि ढुंकून पाहिलं नसतं.

शंखनाद् : पण मीं पाहिलं असतं कीं ! अहो, ढुंकून पाहणं हा तर आमचा धंदा आहे. तुमच्या या प्रकरणांत तुम्हांला कांहीं वाटत नाहीं; पण आमच्या हरिभाऊंना मात्र एका रात्रींत बृहन्महाराष्ट्रांत प्रसिद्धि मिळाली.

झेलम : अस्सं ! बरं, आमचे हे हरिभाऊ उद्योगधंदा तरी काय करतात ?

मामा : माझ्या- 'टिमकी'- या नांवाच्या दैनिकाचे ते संपादक आहेत.

झेलम : Good Gracious ! झारा कितने नासमझ हो तुम ? ये झेलम कभी ऐसे मामुली एडीटरपर थोडीहि आशिक होगी ?

झारासिंग : झेलम हंसी न उडावो- तुम तो जानती हो- की मैं वारा-सिंगका पठ्ठा हूं और प्यारासिंगका उस्ताद हूं ! सीधी तौरसे कबूलायत दो, ( फोटो दाखवून ) ये देख- यह किसने लिखा है ?

झेलम : मैं तो इतना नहीं जानती । फिर इतना तो जरूर जानती हूं- मेरी तसवीर मेरे हाथसे किसीको हरगीज नहीं दूंगी ।

नीतिन : हें तुमचं हस्ताक्षर नाहीं ?

झेलम : मुळींच नाहीं. माझं हस्ताक्षर याच्यापेक्षां जरा बरं आहे. ( मामा खजील होतात.) पण मला हें अजून कळत नाहीं कीं ही अफवा उठवणाराचा यांत हेतु काय असावा ?

झारासिंग : तुम इसी- मेरे प्यारे हरिको नहीं पहचानती ?

झेलम : झारा- प्यारे झारा- मॉकसम—मैने मेरे प्यारे हरिको अभीतक देखा नहीं ।

नीतिन : झारासिंगजी- मलाहि वाटतं या मामांची ही थाप असावी. निव्वळ नूतनला माझ्यापासून तोडण्याकरितां हरिभाऊला प्रसिद्ध बनवून-

झेलम : म्हणजे ? हे मेरे प्यारे हरि- फार प्रसिद्ध आहेत वाटतं. ( तोंच हरिभाऊ आंतून ओ- आयायी मेलों-पोळलों- म्हणत ओरडत येतात. त्यांच्या मागं हॉट वॉटर बॅग घेतलेल्या ममीसाहेब येतात. )

नीतिन : हाच-हाच तो हऱ्या हर्षा.

झेलम : ( कुतूहलानं, हरिभाऊंना आपादमस्तक न्याहाळून ) आपणच हरिभाऊ हर्षे का ?

हरिभाऊ : होय, आपण ?

मामा : हीच ती-

**हरिभाऊ** : काय तीच ही ! मि–मि—

**झारासिंग** : मीमी क्या करता है ? बैठो. इधर बैठो. ( तो यंत्राप्रमाणं बसतो )

**ममी** : या कोण ?

**मामा** : ( कानांत ) हीच ती मिस् झेलम. बोलूं नका– तुमचं आपलं कांहींतरीच–नाहीं. ही खरोखरीच मिस् झेलम आहे.

**ममी** : ( मोठ्यांदा ) हो ? अगं बाई पडद्यापेक्षां तुम्ही बाहेर किती निराळ्या दिसतां हो ?

**मामा** : तें तसंच असतं.

**ममी** : नूतन–ए नूतन. अग हे बघ कोण आलं आहे तें. ( स्वयंपाकघरांत जातात. )

**हरिभाऊ** : ( मामांस ) हा सूर्य आणि हा जयद्रथ समोरासमोर आल्यावर आतां तरी मला खरा प्रकार सांगून टाकलाच पाहिजे. शिवाय आतां नूतननं, हें प्रकरण पाहिलं तर निकालच लागेल माझा. मामा–तुम्ही आंत जाऊन नूतनची आघाडी संभाळा. मी बाहेरच्या या आघाडीला तोंड देतों. ( मामासाहेब जाऊं लागतात. ) झेलमबाई—

**नूतन** : ( ममीसह प्रवेशून ) या घरांत तुम्ही कशा आलांत ?

**शंखनाद** : मला विचारा ? यांना यांनीं आणलं. ( झाऱ्याकडे बोट दाखवतो ) यांना यांनीं आणलं. ( नीतिनकडे बोट दाखवतो. ) आणि यांना तुम्हीं आणलंत हें तुम्हांला माहीतच आहे.

**नूतन** : हरिभाऊ–यांच्यावर तुमचं प्रेम होतं ?

**ममी** : सांगा ना लवकर.

**शंखनाद** : सांगून टाका कीं. त्यांत एवढं लाजायला कशाला हवं ? माझं यांच्यावर प्रेम असतं तर मीं यांच्या गळ्यांत हात टाकूनच ठासून सांगितलं असतं. ( चुकून झाऱ्याच्या गळ्यांत हात टाकतो. ) आमचं असं कांहीं नाहीं म्हणून तर दुसऱ्याच्या मुलाखतीच्या तुकड्यावर जगण्याची आमच्यावर पाळी आलीय्.

**नीतिन** : काय हो ? तुमचं यांच्यावर प्रेम होतं कीं नव्हतं ?

**हरिभाऊ** : नव्हतं–नव्हतं–नव्हतं. ( बसतो )

**झारासिंग** : ए–खडे रहो.

**ममी** : पण पूर्वी होतं ना ?

**हरिभाऊ** : नाहीं– म्हणजे पूर्वी–पूर्वी होतं.

**झारासिंग** : ( ओरडून ) क्या कहां ? ( गळा धरतो )

**हरिभाऊ** : ( बसत ) नव्हतं–पूर्वी नव्हतं– आतां नाहीं– आणि पुढंहि बसणार नाहीं.

**ममी** : आणि मग माझे फ्री पास ? ( पिशवी हरिभाऊंच्या अंगावर फेकून) आणि मी मेलीनं उगीचच यांची पाठ शेकली म्हणायची. आणि त्यांची ही वेणी–पण वेणी राहूं दे.

**नीतिन** : (नूतनकडे जात) नूतन–झाली खात्री ? तुला भुलविण्याकरितांच या दोघांनीं हा प्लॉट रचला होता. हें सारं खोटं आहे.

**झेलम** : (एकदम पालटून जणूं काय एखादा अभिनयच करावा त्याप्रमाणें) नाहीं. हें सारं खरं आहे ( सर्वांना धक्का बसतो ) मेरे प्यारे हरि—

**शंखनाद** : सेन्सेशनल–बोला–बोला–बोलाच.

**झारासिंग** : ( दटावून ) बोला—

**झेलम** : बोलती हूं.– दिलकी असली बात कहनेको किसका डर है ? मेरे प्यारे हरि काश–तुमने मुझे पहचाना नहीं । मुझे अकेली छोडकर किसी और लडकीसे शादी करना चाहता था ?

**हरिभाऊ** : ( दूर सरत ) म्हणजे ?

**झेलम** : दूर कां सरतां ! जवळ या ना. ( त्याच्याजवळ जाऊं लागते. )

**झारासिंग** : खबरदार ! ( दोघं जागच्या जागीं खिळतात. )

**नूतन** : हरिभाऊ–हें खरं आहे ?

**झेलम** : अगदीं अक्षरन् अक्षर. ( तो बसतो )

**ममी** : खरंच ! ( पिशवी उचलून ) हरिभाऊ आतां उसण बरी आहे ना ? कां शेकूं पाठ आणखी ?

**हरिभाऊ** : ममीसाहेब– आतां माझी पाठ शेकण्याऐवजीं माझं टाळकं शेका म्हणजे या फार्सचा आतांच्या आतां निकाल लागेल. मामासाहेब– नूतन—

**झेलम** : तुम्ही सारीजणं नीट ऐका. झारा– प्यारे झारा– सुन ले– ख़ातमीदारसाहेब, टिपून घ्या. हरिभाऊ पूर्वी माझे होते– आतां माझे आहेत– आणि पुढेंहि माझेच राहतील. ( मामा कपाळावर हात मारून खालीं बसतात. ) इतके दिवस या फ्री–स्टाइल राक्षसाच्या तावडींत मी सांपडलें होतें म्हणून जगापुढं माझ्या या प्रियकराचं नांव मी सांगूं शकत नव्हतें. पण—

**नीतिन** : मघांशीं म्हणालांत– यांचं नांव सुद्धां मला माहीत नाहीं.

**झेलम** : मघांशीं मी खोटं बोललें.

**झारासिंग** : माँकी कसम खाती हुई तुझे शरम नहीं आई ?

**झेलम** : क्यों ? मरी हुई माँकी कसम खानेमें शरम क्यों आने लगी ?

**नूतन** : ( मत्सरानें ) हरिभाऊ माझे आहेत. त्यांच्याशीं माझं लग्न व्हायचंय्. ( ओढते )

**झेलम** : ( त्याला आपल्याकडे ओढत ) तुमचं यांच्याशीं लग्न व्हायचंय्– पण माझं– यांच्यांशीं केव्हांच लग्न झालंय्.

**झारासिंग** : क्या ?

**झेलम** : जी– अब चिल्लावो मत. शरीरानं नसलं तरी मनानीं आम्हीं दोघांनीं एकमेकांना केव्हांच वरलं होतं.

**शंखनाद** : म्हणजे Exactly तुम्हीं काय केलं होतंत ?

**झेलम** : तें तुम्हांला कधींच कळणार नाहीं. तुम्ही फक्त मुलाखतीच घ्याव्यात. प्रेमाचे लेख तुम्हांला कधींच कळणार नाहींत.

**झारासिंग** : अच्छा– अब अच्छी तरहसे समझ गया– खैर– तेरे हरिका खीमा करूंगा । मुर्गीके माफिक उसकी गर्दन मुरोडतां हूं– इसका गला घोटता हूं. मै दरवाजेपेहि खडा रहता हूं. तूं नीचे आ, तुझे गले लगावूंगा. मेरे प्यारे हरि, मैं तुझे प्यारका एक नया तरीका बताऊंगा. मैं वारसिंगका पठ्ठा हूं– और प्यारासिंगका उस्ताद हूं. ( रागानं जातो. )

**नीतिन** : तूं खालीं तर ये. आम्ही तुला वरच पाठवतों. ( जातो )

**झेलम** : यांच्या केसालाहि कुणी धक्का लावील तर जादु–ई–कत्तलमधल्या व्हिलनप्रमाणें मी त्याला गोळी घालीन. उद्यांच मी यांच्याशीं लग्न लावणार आहें. ( हरिभाऊ कोसळतो. )

**नूतन :** ममी– ( रडते ) करायला गेलें एक अन्– ( दोघी जातात. )

**झेलम :** मेरे प्यारे मजनू, मैं अभी टॅक्सी ले आइ, हम दोनों साथ ही सत्कारके लिये जायेंगे.– ( जाते )

**शंखनाद :** झेलमबाई– ती मुलाखत अर्धीच राहिली आहे. बाई, तुमचा ब्लॉक आहे का ब्लॉक ! ( धांवत जातो. बेल वाजते. )

**मामा :** ( फोनमध्यें ) हॅलो ! आतां खुशाल कनेक्शन तोडा. आमचं फिसकटलं ! हरिभाऊ–आपण करायला गेलों एक अन्...( पडदा पडतो )

# ३

[ **स्थळ**—मागील अंकांतीलच. त्याच रात्रीं ९ वाजतां मामा व हरिभाऊ दिवाणखान्यांत येरझारा घालीत आहेत. अधूनमधून दोघंहि भीतीनं खिडकींतून खालीं पाहात आहेत. या मूकदृश्याचा टेलिफोन बेलमुळें भंग होतो. मामा फोन घेतात. ]

**मामा** : हॅलो ! टेलिफोन ऑफि—रेनबो टॉकीज ? नाहीं—नाहीं. हरिभाऊंची उसण अजून बरी झाली नाहीं. आम्ही सारेजणं येऊं ? नाहीं— नाहीं. आम्हां साऱ्यांच्याच पाठींत उसणी भरल्या आहेत. काय ? वरवंटे फिरवूं ? बरं—बरं ! ( रागानं फोन खालीं ठेवतात. )

**हरिभाऊ** : ( खिडकीपासून बाजूला होत ) अजून लेकाचा तो राक्षस आहेच खालीं. मामासाहेब, तुमच्या घराला मागचं दार आहे का हो ?

**मामा** : हं—या मामालाहि मामा बनवणारी ही घटना घडली खरी. मला अजून कळत नाहीं कीं—खरंच तुमचं या झेलमवर प्रेम होतं ?

**हरिभाऊ** : भले ! तुम्हांलाहि असं वाटतं काय ? बाकी तिनं माझ्या गळ्यांत हात टाकले तेव्हां क्षणभर मलाहि वाटलं बरं का—कीं या जन्मीं नसेल, पण गेल्या जन्मीं तरी खात्रीनं हिचं माझं कांहीं तरी असलं पाहिजे. वा— वा— 'हरि' या नांवांतसुद्धां काय गोडवा भरलाय् याची आज मला कल्पना आली.

**मामा :** होय ना. आणि मलासुद्धां आज कल्पना आली कीं, म्हणूनच गोकुळांतल्या त्या हरीवर वट्ट १६१०८ गोपी भाळल्या असल्या पाहिजेत. पण हरिभाऊ, तुमची हिची पूर्वीची ओळखसुद्धां नव्हती ?

**हरिभाऊ :** अहो, खरंच नव्हती. आईशपथ नव्हती. हं—आतां एक शक्य आहे. कदाचित् मला पाहिल्यावर तिचं माझ्यावर प्रेम बसणं शक्य आहे.

**मामा :** तुम्हांला पाहिल्यावर ? गुरु आहांत झालं.

**हरिभाऊ :** कां ? नूतनचा मत्सर जागृत करण्यासाठीं आपण झेलमचं प्रकरण उभं केलं तसं त्या झेलमनं त्या फ्री-स्टाइल्याचा मत्सर जागृत करण्यासाठीं हा फार्स केला असेल. बाकी हें झेलम प्रकरण खरोखरीच आपल्यापुढं दत्त म्हणून उभं राहणार आहे, याची आपल्याला आधीं कल्पना असती तर आपण नूरजहानचं माझ्यावर प्रेम होतं अशी थाप मारली असती.

**मामा :** होय ना. आपण करायला गेलों एक—

**हरिभाऊ :** अन् झालं भलतंच !

**मामा :** पण या एकंदर प्रकरणांत कमींत कमी त्या नाच्याला तर आपण नूतनपासून फोडला कीं नाहीं ? आतां त्या खालीं उभ्या असलेल्या दुक्कलीला पिटाळून लावायचं. तें माझं काम. खालीं जाऊन त्या फ्री स्टाइल्याला थाप मारतों कीं—हरिभाऊ येथून पळाले असून आत्तांच्या आत्तां झेलमला घेऊन ते काश्मीरला पळून जाणार आहेत. माझी खात्री आहे कीं, या थापेनं तो झारा विमानासारखा धांवत जाऊन त्या झेलमची मानगूट पकडून तिला सांपडेल त्या पहिल्या गाडीनं तो मुंबईला घेऊन जाईल. आलोंच मी. ( खालीं जातो. ) ( तोंच बाहेर जाण्याच्या तयारीनं नूतन वरून येते. )

**हरिभाऊ :** नूतन— कुठं चाललीस ?

**नूतन :** नीतिनकडं. त्यांच्यासारख्या हळव्या मनाच्या माणसाला मीं उगीच दुखावलं. त्यांची माफी मागतें. अन्—

**हरिभाऊ :** पुढचं बोलूंच नको. तें ऐकण्यापेक्षां सरळ त्या राक्षसाच्या जबड्यांत जाऊन मान अडकवलेली काय वाईट !

**नूतन :** ही तुमची प्रेमाची भेट परत घ्या. ( रुमाल त्याच्या अंगावर टाकते. )

हरिभाऊ : नूतन, पोस्टाच्या पेटींत टाकलेलं कोडं आणि प्रेमानं दिलेली भेट मालकाला कधींच परत येत नाहीं. हा रुमाल म्हणजे माझ्या अखंड प्रेमाचा चतकोर तुकडा होता.

नूतन : प्रेमाच्या असल्या चतकोर—त्यांतून उष्टया तुकड्यावर जगण्या-इतकी मी प्रेमाची भुकेली होतें अशी तुमची कल्पना आहे काय ? वाघाला रक्ताची अन् पुरुषाला स्वैराचाराची जन्मतःच चटक असते. जा—खुशाल त्या झेलमकडे जा— तिच्याबरोबर मोटारी फिरवा— विमानं उडवा—सत्कारसमारंभ साजरे करा— तिच्याबरोबर लग्न करा. पुरुषांनीं एक लाज सोडली कीं, त्यांना नटीचा नवरा होण्याइतकं दुसरं भाग्य नाहीं जगांत.

हरिभाऊ : पण नूतन—मी आईशपथ सांगतों, कीं पडद्याशिवाय तिला आज मीं प्रथमच पाहिली.

नूतन : अस्सं ! आणि प्रथम भेटींतच—मेरे प्यारे हरि करून ती तुमच्या गळ्यांत पडली— ती काय तिचं तुमच्यावर प्रेम असल्याशिवाय ! ती माझ्या नाहीं गळ्यांत पडली ! आमच्या पपांच्या नाहीं गळ्यांत पडली ! हरिभाऊ— 'ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी.' स्त्रियांचीं पावलं स्त्रियाच ओळखूं शकतात.

हरिभाऊ : बरं— आतां खरं सांगूं ? होय, तुझ्यापूर्वी माझ्या आयुष्यांत तेवढी एकच स्त्री येऊन गेली होती, पण आतां तिचं माझं कांहींएक राहिलं नाहीं. झालं ? आतां तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाहि स्त्रीचा मी विचार करणार नाहीं. अगदीं आईशपथ.

नूतन : पाहा बरं ! ठीक आहे. तुमच्या हातून आयुष्यांत एकदांच झालेली ही चूक विसरून मी तुम्हांला क्षमा करतें.

हरिभाऊ : थँक्यू ! नूतन माझ्या डोळ्यांत पाहा. तिथं तुला नूतनची एक लहानशी बाहुली दिसेल.

नूतन : हरि— तो रुमाल दे इकडं. ( तो देतो ) पण नक्की आणखी कोणी तिसरी नाहीं ना ?

हरिभाऊ : नाहीं— नाहीं— नाहीं— ( तोंच गौरीबाई येतात. ) तुम्ही कोण ?
गौरीबाई : ( नखऱ्यानें ) गौरीबाई गोवेकर—

हरिभाऊ : बाप रे ! तुम्हीं इथं ? नूतन, चल, वर चल. ( शंकित झालेल्या नूतनला हरिभाऊ ओढीत घेऊन वर जातो. )

( मामा त्या दुक्कलीला घालवल्याचा निःश्वास टाकून येतात तोंच त्यांना गौरीबाई दिसतात. ते दचकतात. )

मामा : तुम्ही ! इथं ! ( घाईघाईनें स्वयंपाकघराचें दार लावतात. )

गौरीबाई : हो. कां तें तुम्ही तुमच्या मनालाच विचारा. घरीं चारदां अन् छापखान्यांत दहादां फोन केला. तर नंबरच लागेना.

मामा : शक्य आहे. आमच्या फोनचीं कनेक्शनं बिघडलीं आहेत.

गौरीबाई : पण मग गेले तीन दिवसांत तुम्ही माझ्याकडं फिरकला कां नाहींत ? कुणाला मुंडावळ्या बांधायला गेला होतात ? कां स्वतांचं लग्न लावून आलांत ? बायको मरून आजून सहा महिनेसुद्धां झाले नाहींत तोंच—

मामा : अहो— पण— तुम्ही आधीं खालीं चला बरं. मी सगळं सांगतों तुम्हांला ?

गौरीबाई : कां ? इथं कोण मला खाणार आहे ? (स्वयंपाकघराच्या दाराकडे जाऊं लागते. )

मामा : ( तिला बाजूला घेत ) अहो, तिकडं जाऊन मोठ्यांदां कोकलूं नका.

गौरीबाई : कां ?

मामा : तिकडं— आमच्या मृत कुटुंबाचं भूत वावरत असतं.

गौरीबाई : ( घाबरून ) अगबाई— मग जाऊं दे मला. माझीं पातळं द्या.

मामा : हो— त्याचं काय आहे; तीं मीं कुठं ठेवलीं आहेत हेंच मला आठवत नाहीं.

गौरीबाई : या थापा तुम्ही मला मारूं नका. लग्नाची तुम्हांला अशी टाळाटाळ करायची असेल तर ही चाललें मी. यापुढं तसं राहणं मला बरं वाटत नाहीं. ( तोंच ममीसाहेब आंतून दार वाजवतात. )

ममी : ( आंतून ) हें काय ! दार कुणीं लावलं ! नूतन— अहो—

गौरीबाई : अगबाई आंत कुणी दुसरी बाई आहे वाटतं ! तरीच— ( दार उघडते. ममीसाहेब बाहेर येतात. दोघींची साशंक दृष्टादृष्ट. मामा घाबरतात ) या कोण ?

ममी : अन् या कोण ?

मामा : या– या–

ममी : असं या–या काय करतां ? कोण ही बया ?

गौरीबाई : अहो, मी बया असेन नाहींतर बुवा असेन– तुम्हांला काय करायचंय् त्याच्याशीं ? आणि काय हो ( मामांस ), हें तुमचं मृत कुटुंब होय ? का त्याचं भूत ?

ममी : मी भूत होय ? डाकिणी– तूं कोण आहेस ?

मामा : यांचं नांव चमेलीबाई वेलींगकर. ( गौरीबाई कांहीं बोलूं इच्छितात; पण मामा त्यांना गप्प करतात आणि ममीच्या कानांत सांगतात. ) हरिभाऊंची ही आणखी एक भानगड !

ममी : म्हणजे– हरिभाऊंनीं काय एखादा झनानखानाच ठेवला होता काय ?

गौरीबाई : काय– बोलतांय् काय तुम्ही ? हरिभाऊ ? माझं नांव–

मामा : गप्प बसा हो– हरिभाऊंनीं तुमच्या नांवासकट सगळं सांगितलंय् आम्हांला.

ममी : आणि हें प्रकरण केव्हांचं ?

मामा : झाले असतील दोन तीन महिने.

गौरीबाई : ( मामांस ) २–३ महिने नाहीं, चांगलं वर्ष झालं. ( ममीस ) तुम्हांला किती दिवस झाले ?

ममी : ( एकदम घाबरून ) मला–दिवस ? नूतन–ए नूतन–अगं ही बघ कोण ! ( वर जाते. )

गौरीबाई : नूतन ? ही कोण काढलीय् दुसरी ?

मामा : सांगतों. पण तुम्ही इथं कशाला मरायला आलांत !

गौरीबाई : ( रडत ) हो—चुकलं खरंच. तुम्ही इथं घरांत दुसऱ्या बाया आणून ठेवत जा आणि—

मामा : अहो, अशा भरल्या घरांत रडूं नका हो !

गौरीबाई : तुमचं असेल भरलं घर. मला घर नाहीं–दार नाहीं–कुण्णी कुण्णी नाहीं. माझीं पातळं द्या आधीं. तेवढीच तुमची आठवण—

मामा : देतों–देतों. अहो, तुमचीं पातळं घेऊन मला काय करायचंय् ! तुम्ही अशा आंत या बरं.

गौरीबाई : आंत ? विसरा आतां तें.
मामा : चला—पातळं आंत आहेत. ( त्यांना आंत नेतो तोंच वरून नूतन-तिच्या मागं हरिभाऊ—त्यांच्या मागं ममीसाहेब येतात. )
हरिभाऊ : नूतन—तूं माझ्यावर विश्वास ठेव—चमेलीबाई वेलीगकर हें नांव यापूर्वी मी ऐकलं सुद्धां नाहीं.
ममी : हें काय ? कुठें गेली ती ?
नूतन : म्हणे आईशपथ- तेवढी एकच स्त्री माझ्या आयुष्यांत आली होती. पण मघांशीं तिला पाहून तुम्ही घाबरलांत तेव्हांच लक्षांत आलं माझ्या. थापाडे—उडाणटप्पु.
हरिभाऊ : नूतन-खरंच सांगतों—या नांवाची बाई मीं पाहिलीसुद्धां नाहीं.
ममी : आतांच आली होती ती इथं.
हरिभाऊ : पाहिली तिला मीं. तिनं इथं यायला नको होतं.
ममी : पण आली त्याला काय करणार ? यांनीं मला सगळी हकीकत सांगितली आहे.
हरिभाऊ : हं-तुम्हांला कळलं म्हणायचं सारं ? पण मामांनीं स्वत: तोंडानीं सांगितलं ?
ममी : होय—आणि तें ऐकून मला फार वाईट वाटलं.
हरिभाऊ : साहजिक आहे. तुमच्या जीवनाशींच तिचा संबंध आहे.
नूतन : ( रडत ) तिच्यापेक्षां माझ्याच जिवनाशीं. ममी—ममी—
ममी : उगी उगी पोरी. मला वाईट वाटतं तें हें कीं ती दिसायला तरी जरा बऱ्यापैकीं पाहिजे होती.
हरिभाऊ : चालायचंच. पुरुषांचं दुसरं लफडं नेहमींच असं डागाळलेलं असतं.
ममी : मला वाटतं नूतनला सारं सांगून टाकावं.
हरिभाऊ : ( आश्चर्यानें ) सारं ! नूतनला ?
ममी : अर्थात् तिलाच !
हरिभाऊ : पण तें ऐकून तिला धक्का बसेल.
ममी : बसूं दे. सांगतेंच.

हरिभाऊ : सांगा. तुम्ही तिची आई आहांत अन् ते तिचे बाप आहेत.
( तोंच आंतून हातांत पार्सल घेतलेली गौरी व मामासाहेब दबकत दबकत येतात. )

ममी : ( पाहून ) हीच ती.

गौरीबाई : ( नूतनला पाहून ) आणि ही कोण दुसरी सटवी ? म्हणजे हें घर आहे का बायकांचा पांजरपोळ आहे ?

ममी : ए बाई–शिव्या कां देतेस ? नूतन–हरिभाऊंचं हें दुसरं प्रेमप्रकरण.

हरिभाऊ : म्हणजे ? ( कोसळतो )

नूतन : ( रडत ) एक नटी–एक नायकीण–आणखी किती आहेत कोणास ठाऊक ? फसवे– खोटारडे– नाटकी– हा घ्या तुमचा रुमाल. ( त्याच्या अंगावर फेकते ) पपा, मी आजच्या आज जाणार आणि उद्यांच्या उद्यां मी त्या नीतिनशीं लग्न लावणार. ( वर जाते )

मामा : अहो बाई नीट ऐका–हें माझं कुटुंब. आणि तें जिवंत आहे.

गौरीबाई : काय ? म्हणजे तुमचं कुटुंब जिवंत आहे काय ? ( पार्सल गळून पडतें )

मामा : नाहीं– म्हणजे– होय.

गौरीबाई : अस्सं–मामासाहेब, म्हटलं नांवाची गौरीबाई गोवेकर आहे.

ममी : ( चवताळून ) कोण ?

गौरीबाई : कां हो ? माझं नांव ऐकून इतकं चवताळायला काय झालं ? तुमचा नवरा थापाड्या आहे हें तुम्हांला कळलं म्हणून कीं काय ? त्यांच्यावर अब्रुनुकसानीची फिर्याद न गुदरेन तर नांवाची गौरीबाई गोवेकरच नव्हे. ( जाऊं लागते. )

ममी : तुमचीं पातळं राहिलीं.

गौरीबाई : नेसा तुम्हीच. हलकट– पाजी– बदमाष– ( जाते )

ममी : काय हो ? ही गौरीबाईची चमेलीबाई वेलींगकर कशी झाली ?

मामा : तुम्ही लागवणकराच्या मालवणकर कशा झालांत ?

ममी : म्हणजे ?

मामा : तिचं माहेरचं नांव गौरीबाई गोवेकर असून–चमेलीबाई वेलींगकर हें तिचं सासरचं नांव.

ममी : अन् तिच्या गळ्यांत मंगळसूत्र नाहीं तें ?

मामा : तिचे यजमान वारलेत.

ममी : तरीच. ( रडत ) तुम्ही असं कराल असं स्वप्नांत सुद्धां वाटलं नव्हतं मला. नूतन– चल मीहि तुझ्याबरोबर येतें. नूतन– ( वर जाते )

हरिभाऊ : ( मामांना साष्टांग नमस्कार घालून ) मामासाहेब, आतां हद्द आहे तुमच्या थापांपुढें. तुमच्या रोमरोमांत थापा एवढ्या भिनल्या आहेत कीं उद्यां तुम्ही मेलांत म्हणून तुम्ही आम्हांला सांगितलंत तरी ती आम्हांला थाप वाटेल.

मामा : ओरडूं नका. नाहींतर तो वारासिंगचा पठ्ठा– प्यारासिंगाचा उस्ताद धांवत यायचा एकादे वेळेस.

हरिभाऊ : (आठवण येऊन–एकदम उठून–खिडकीजवळ जाऊन) म्हणजे अजून तो खडा पारशासारखा उभा आहेच का ?

मामा : छे हो. या मामानं शिष्टाई केल्यावर अपयश येईल ? काय बिशाद आहे ? त्याला चक्क खडसावलं कीं मेहेरबान हें घर आहे– कां सर्कसचा तंबू आहे ? कां फ्री–स्टाइल कुस्तीचा आखाडा आहे ? तरी तो रावण हलेना. पण मग तुम्ही झेलमला पळवणार असल्याची थाप त्याला मारली मात्र – वाऱ्यासारखा सैरावैरा धांवत गेला–

हरिभाऊ : मरूं दे तो. पण नूतन मात्र माझ्या हातची आतां कायमची गेली.

मामा : जाऊं दे. मी आहें—

हरिभाऊ : आतां आईच्या गळ्याचीच काय, पण आजीच्या गळ्याची शपथ घेतली तरी तिचा माझ्यावर विश्वास बसणार नाहीं. ( तोंच शंखनाद धांवत धांवत येतो )

शंखनाद : मामासाहेब–हरिभाऊ–धांवा–पळा नाहींतर मराल–

मामा : अहो, काय झालं हो.

शंखनाद : अहो, काय सांगूं ? मी ताडीवाला हॉटेलमध्यें मिस् झेलमची मुलाखत घेत बसलों होतों तर हातांत ८ इंची सुरा घेऊन तो फ्री–स्टाइल रावण तिथें धांवत आला–त्याला वाटलं हरिभाऊच आंत आहेत, तेव्हां तो दारावर लाथा मारूं लागला. बाई मला म्हणाल्या खिडकींतून, व्हेन्टीलेटर-

मधून, बाथरूममधून, लॅटरीन्समधून, वाट फुटेल तिकडून पळा. म्हणून खिडकींतून ड्रेनेजच्या नळावरून आम्ही रस्त्यावर आलों.

**झेलम** : ( प्रवेशून ) धांवा–पळा– हरिभाऊ– जीव वांचवा– ते आले. त्यांना सामोरे जाल तर प्राणांस मुकाल.

**हरिभाऊ** : मामासाहेब, आतां मात्र ठार झालों.

**शंखनाद** : बाई, ती अर्धी राहिलेली मुलाखत पुरी करूं या का ?

**झेलम** : चुलींत घाला तुमची मुलाखत. इकडं एकाचा जीव आणि एकीचं जीवन धोक्यांत आहे अन् तुम्हांला मुलाखत सुचतीय् ? मला वाटतं तुम्ही स्वर्गात गेल्यावर यमाची सुद्धां मुलाखत घ्याल.

**शंखनाद** : हो–हो यमाचीच काय– पण त्याच्या रेड्याची सुद्धां घेईन. सोळा वर्षांच्या ज्ञानेश्वरांनीं रेड्याच्या तोंडांतून वेद वदवला तर बत्तीस वर्षांच्या या शंखनादाला रेड्याकडून मुलाखत वदवतां येणार नाहीं काय ?

**मामा** : शंखनाद, सगळ्यांच्या मुलाखती घेण्यापेक्षां तुम्ही त्या झारा-सिंगाची कां मुलाखत घेत नाहीं ?

**शंखनाद** : हो– हो–घेतों कीं. ( जाऊं लागतो, पण एकदम लक्षांत येऊन, थबकून ) छे– छे– अहो, तो झारासिंग म्हणजे प्रत्यक्ष यमाचा चुकलेला रेडाच––

**झारासिंग** : ( बाहेरून– मैं उसका खून करूंगा– उसकी मुर्गी बनाऊंगा )

**झेलम** : बाप रे– झारा आला. मला त्यानं इथं पाहिलं तर तो माझाहि खून केल्याशिवाय राहणार नाहीं. मामासाहेब, तुमच्या घराला मागचं दार आहे का हो ?

**मामा** : इतके दिवस नव्हतं. पण गेल्या तीन दिवसांत माझ्या घरांत घडलेल्या या घटना पाहतां माझ्या घराला मागचं दार पाडलंच पाहिजे मला.

**शंखनाद** : Idea ! झेलमबाई– आपण या खिडकींतून जाऊं– खिडकीं तून बाहेर जाण्याचं प्रॅक्टीस झालंच आहे आपल्याला. आपण सरळ टॅक्सी तून रेनबो टॉकीजवर जाऊं. रोमिओ दोराला धरून वर आला– तुलसीदास सापाला धरून वर आला– आपल्या दोघांना ड्रेनेजच्या नळाला धरून खालीं जायचंय्– चला.

झेलम : ( जातां जातां ) मामासाहेब, मी थिएटरवर गेलें आहे म्हणून झारा-सिंगाला सांगूं नका हं ! नाहींतर तिथें येऊन तो गोंधळ करील.

मामा : जा हो तुम्ही. थापा कशा माराव्या हें तुम्ही मला शिकवताय् होय ? तुम्ही स्पेशल मोटारनं मुंबईला— नव्हे डकोटा विमानानं इंडोनेशि-याला-नव्हे रॉकेटच्या साहाय्यानं मंगळावर पळून गेलांत अशी थाप मारा-यला सुद्धां हा मामा कमी करणार नाहीं. आत्तां तुम्ही फक्त माझ्या खिडकींतून खालीं जा. ( दोघं खिडकींतून बाहेर जातात. तोंच झारासिंग बाहेरून —मैं उसका गला घोटूंगा—फांशी हो गयी तो परवाह नहीं—असें ओरडतो.)

हरिभाऊ : मामा—मला लपवा कुठंतरी. नाहींतर मीच लपतों ! (कोचामागं लपतो )

झारासिंग : ( प्रवेशून ) मैंने मेरी ऑखोंसे देखा है। इस कम्बख्तको झेलमके कमरेमें । कौन जाने क्या करता था—

मामा : झारासिंग, आपण चुकतां आहांत. हा चक्क फाऊल करतां आहांत तुम्ही.

झारासिंग : क्या ? मुझे कभी फाऊल करनेकी आदत नहीं—मैं वारासिंगका पठ्ठा हूं और प्यारासिंगका उस्ताद हूं !

मामा : कबूल. पण झेलमच्या खोलींत हरिभाऊ नव्हते. आमच्या टिमकीचे बातमीदार शंखनाद होते.

झारासिंग : अच्छा, तो उसे बताओ— उसे भी तबाह करूंगा. ( कोचाकडे जाऊं लागतो )

मामा : ( त्याला पुढें आणीत ) फाऊल नं. २. शंखनाद मिस् झेलमची मुलाखत घेत होते.

झारासिंग : मुलाकात ? ये किस चिडीयाका नाम हैं ?

मामा : सांगतों. पण त्याच्या आधीं मिस् झेलमचा तुम्हांला एक निरोप आहे. ती म्हणाली कीं—मी निव्वळ तुमचा मत्सर जागृत करण्यासाठींच— हरिभाऊंवर प्रेम असल्याचं फक्त ॲक्टिंग केलं होतं.

झारासिंग : ॲक्टिंग ?

मामा : होय. तुम्ही किती मूर्ख आहांत—

झारासिंग : क्या ?

**मामा :** ओरडूं नका. असं झेलमबाई म्हणाल्या. तुम्ही किती मूर्ख आहांत हें तुम्हांला पटवण्यासाठींच तिनं हा फार्स केला. तिचं तुमच्यावरच प्रेम आहे.

**झारासिंग :** ( राग निवळत जाऊन ) सच ?

**मामा :** सच सच खरोखरीच सच. तिनं यांनाहि सांगितलय्, कीं गेले तीन दिवस हा नाचा—

**नीतिन :** ( ओरडून ) नाचा ?

**मामा :** ओरडूं नका. हे तिचेच शब्द आहेत. गेले तीन दिवस तुम्ही तिच्या मागं आहांत हें तिच्या लक्षांत आलंय्.

**झारासिंग :** कौन ? तूं नामर्द— ( त्याला धरतो आणि ती दुकल कोचामागें जाऊं लागते. )

**मामा :** ( त्यांना पुढें आणीत ) फाऊल नं. ३. तिकडे जाऊं नका. तिकडे झनाना आहे. शिवाय ती असंहि म्हणाली कीं—खरा नर्तक तोच कीं जो एरवीं पुरुष—पुरुषोत्तम वाटावा आणि फक्त स्त्री-विषयक आविर्भावांतच तो बृहन्नडेसारखा नाजुक व्हावा. आणि म्हणूनच मला हजारों नर्तकांपेक्षां एकच फ्री-स्टाईल कुस्तीगीर आवडतो. आणि हजार फ्री-स्टाईल कुस्तीगिरांना चितपट मारणाऱ्या एकुलत्या एक झारासिंगाशींच मी लग्न लावणार आहें.

**झारासिंग :** ( चाकू टाकून ) मेरी प्यारी झेहलम ( मामांना मिठी मारायला जातो. )

**मामा :** ( घाबरून ) अहो ! असं ती म्हणाली.

**झारासिंग :** झेलम तुम कहाँ हो ? प्यारी—

**मामा :** लग्नाचे हार आणायला गेली आहे ती. झारासिंग, तुमकी शादी आजच होगी, इधरच होगी आणि झेलमबाईबरोबरच होगी.

**नीतिन :** झारासिंग, तुम्हीं मुळींच विश्वास ठेवूं नका यांच्यावर. हे नं. १ चे थापाडे आहेत.

**झारासिंग :** तुम खामोश बैठो, मामाजी, ठीकही कहते है— मेरी प्यारी झेलमने ॲक्टिंगहि किया होगा— अरी बहोत चालाक लडकी है वो— है तो एक मामुली ॲक्ट्रेस फिर जबानकी मीठी और दिलकी पाक— वो मेरे सिवा और किसीसे मोहब्बत हरगीज नहीं करेगी, मामाजी, मैं कितना बना था !

मामा : छे हो. तुम्ही संपूर्ण शहाणे होतात, पण तुम्ही या अर्धवट मास्टर-जींत मिसळलांत अन् असे दीडशहाणे झालांत. यानें हिंदींत- बेवकूब. शिवाय झेलमबाई असंहि म्हणाल्या कीं- झारासिंग जैसे खुबसुरत आदमी मैंने दुनियेंतसुद्धां नहीं देखा!

झारासिंग : मेरी प्यारी झेलम-मेरी मुमताझ-मेरी नूरजहाँ- तुम कहां हो? फूलोंकी मालासे नहीं तुम्हारे हाथोंसे लिपट जाना चाहता हूं!

मामा : शाबास. झारासिंग, आतां कारासिंगाचे बच्चे शोभतां खरे. हा सुरा इथं ठेवतों. (मामा टेलिफोनजवळ तो सुरा ठेवतो.) कारण ती असंहि म्हणाली कीं- फ्री-स्टाइल कुस्तीगिरांनीं चाकू वापरणं ही नामुष्कीची गोष्ट आहे. 'अहिंसा परमो धर्मः' - (झाऱ्यास) तुम्हांला कळलं? (नीतिनला) तुम्हांला कळलं? मला कळलं. 'न धरी शस्त्र करीं मीं-' असं भगवान् श्रीकृष्णानं गीतेंत म्हटलंय् तें काय उगाच? पांडवांनीं बारा वर्षें का होईना, पण शस्त्रसंन्यास घेतला तो काय ते मूर्ख होते म्हणून? राष्ट्रं हिंसेनें जगत नाहीत, अहिंसेनें जगतात; ॲटम- हैड्रोजन निर्माण करणारीं राष्ट्रं उद्यां मरणार आहेत; पण अहिंसेच्या श्वासावर जगणारा भारत चिरंजीव आहे- आणि ही तरी थाप नाहीं- असं झेलमबाई म्हणाल्या.

झारासिंग : मामाजी- मामाजी आप मानो अहिंसाका फ्री-स्टाइल चॅम्पीयन है!

नीतिन : अहो, थापांचा फ्री-स्टाइल चॅम्पीयन म्हणा. झारासिंगजी, आप झेलमसे कितने सालोंसे प्रेम करते हैं?

झारासिंग : तकरीबन दो- सवा दो साल हो-

नीतिन : मग हे फोटो पाहा आणि हेहि फोटो पाहा. इस तसबीरमें मिस् झेलमने कौनसा कॉस्च्यूम याने मेरा मतलब कौनसा लिबास पहना हुआ है?

झारासिंग : वाह! इस लिबास को तो मैं खूब जानता हूं! जादू-इ-कत्तलमें इस लिबासको पहनकर झेलम नाचती गाती आती थी।

नीतिन : अच्छा- ये जादू-इ-कत्तल पिक्चर कब निकला गया था?

झारासिंग : मेरा ख्याल है चार महिनेके पहले-

नीतिन : तो फिर! जादू-इ-कत्तलके लिबासमें निकली हुई इस तसबीर पर झेलमने जो कुछ लिखा वह चार महिनेके आसपास होगा-

**झारासिंग** : हां बिलकुल ठीक, मास्टरजी, आप नर्तकके बदले जासूस याने सी. आय. डी. क्यों नहीं बने ?

**नीतिन** : बोला—मामासाहेब मालवणकर The Great Bluffer—अजूनहि तुमच्या थापांवर आम्हीं विश्वास ठेवावा काय ?

**झारासिंग** : हरगीज नहीं— मास्टरजी, मेरा सुरा ले आईये. मामाजी— आप क्या हमे दूध पीते बच्चे समझ बैठे है ?

**नूतन** : ( प्रवेशून ) काय आरडाओरडा चाललाय् ? ( तिच्या हातांत बॅग असल्यामुळं घर सोडण्याचा तिचा इरादा स्पष्ट दिसत आहे. ) आणि हरिभाऊ तुम्ही इथं काय करतां आहांत ? ( त्याला उठवते तों नेमका तो झारासिंगाच्या तावडींत सांपडतो. )

**झारासिंग** : अब तू कहा जायेगा कम्बख्त ? ( त्याचा गळा धरतो )

**मर्मा** : ( प्रवेशून ) अगं बाई हें काय ? इथं फ्रीस्टाइल कुस्ती तर नाहीं ना चाललेली ? अहो, तुम्ही घरांत चला. गेल्या तीन दिवसांत नर्तक—नर्त्या— नायकिणी अन् फ्री-स्टाइल वेडेपीर गांवभर मोकाट तर नाहीं ना सुटलेले ?

**मामा** : नाहीं नाहीं, मुलीला कलावंत नवरा हवा म्हणणाऱ्या तुम्ही—उत्तर प्रदेशांत नाच शिकणारी आमची ही कन्यारास— बंगालचे हे मास्टरजी— दिल्लीचे हे झारासिंग— पंजाबची ती झेलम— गोव्याच्या गौरीबाई— मुलाखतीचा मेनिंजायटिस झालेला आमचा तो शंख—आणि लोक ज्याला थापांचा अलेक्झांडर समजतात तो मी—या लोकांनीं आपल्या घरांत ही आंतरप्रांतीय परिषदच चालवली आहे. आणि ही थाप नाहीं, हें प्रत्यक्ष पाहा.

**नीतिन** : बारासिंगाचे पट्ठे— प्यारासिंगाचे उस्ताद— थांबलांत काय ! चाकू द्या.

**नूतन** : थांबा. ( काकुळतीनं ) नीतिन—कशाकरतां चालवला आहे तुम्ही हा खटाटोप ?

**नीतिन** : तुझ्यासाठीं. या राक्षसकडून या माकडाचा निकाल लागला तर तूं माझी होशील—या विचारानंच मी हें सारें करतोंय्.

**नूतन** : मग त्यासाठीं अशीं द्वंद्वं कशाला पाहिजेत ? तिलोत्तमेसाठीं सुंदो-पसुंद लढले; कारण त्या दोघांचंहि तिच्यावर सारखंच प्रेम होतं म्हणून.

पण माझ्या बाबतींत तसं कांहींच उरलं नाहीं आतां. घर सोडून जाणाऱ्या कुठल्याहि नाटकांतल्या नायिकेप्रमाणं–मी तुमच्याकडेच यायला निघालें होतें. मी तुमच्याशीं लग्न करायला तयार आहें. पण हरिभाऊंचा जीव वांचवलांत तर–

**हरिभाऊ :** नूतन– थांब. मला जीवदान मिळून जर तूं माझ्या हातची जाणार असशील तर मला जगून तरी काय करायचं आहे ? आणि मरायचंच झालं तर मी मारतां – मारतां तरी मरेन. शिवाय या अर्जुनाला या शिखंडीच्या आडून बाण मारायची कांहींच जरूर नाहीं. नूतन–होय. त्या गौरीबाईवर– नीतिन– तुमच्या या शिष्येवर– झारासिंग– तुमच्या झेलमवर माझं प्रेम होतं. बाकीच्या ९९७ जणींचे पत्तेहि मी तुम्हांला देतों वाटलं तर ! आ– आ– लढ मेरे साथ. फ्री-स्टाइलसे लढ– ( हरिभाऊ पवित्र्यांत उभे राहतात. )

**झारासिंग :** अबे फ्री-स्टाइलके बच्चे–फ्री-स्टाइलका पहला पैतरा ऐसा नहीं– ऐसा होता है—

**हरिभाऊ :** (त्याला झटकीत) दूरसे बात कर. ही फ्रीस्टाइल जादू-इ-कत्तलमध्यें मिस् झेलमची अन् व्हिलनची जशी अंधारांत झाली तशी होईल.: कबूल ?

**झारासिंग :** ( तुच्छतेनं हंसत ) कबूल ! ( सारेजण– त्यांतल्या त्यांत हरि दचकतो. )

**ममी :** नूतन, चल बाई. फ्रीस्टाइल कसली, हातघाईच ही.

**नूतन :** ( जागच्या जागीं खिळून ) थांब. ममी–या राक्षसाला हरिभाऊंनीं आव्हान दिलं यांतच हरिभाऊंनीं मला जिंकून टाकलं ( बॅग टाकते ). नागिणीप्रमाणं मला त्यांनीं जागच्या जागीं खिळून टाकलं. ( तोंच मामा दिवे घालवतात. हरिभाऊ अंधारांत झारासिंगावर खुर्चीचा प्रहार करतात. झारासिंग प्रति– प्रहार करतात; पण चुकून तो नीतिनला लागतो. तो ओरडतो. अंधारामुळं ही बहुतेक कुस्ती दृश्यापेक्षां श्राव्यच होते. मामा दिवे लावतात. तेव्हां रंगभूमीवर झारासिंग आणि नीतिन बेशुद्ध झालेले दिसतात. कपाटांत लपलेले हरिभाऊ हळू हळू बाहेर येतात. त्यांचा त्या दृश्यावर विश्वास बसत नाहीं. बाकीच्या साऱ्यांनीं आंत पलायन केलेलें असतें. मामासाहेब घाबरून हळू हळू पुढें येऊन त्या बेशुद्ध दुकलीला पाहून

स्तिमित होतात. मामा जाऊन हरिभाऊंच्या पाठीवर हात मारतात. हरिभाऊ दचकून ओरडतात. )

**मामा** : हरिभाऊ, तुम्ही अजून जिवंत आहांत ?

**हरिभाऊ** : तुम्हांला काय दिसतंय् ?

**मामा** : नाहीं. मला दिसतंय् त्याच्यावर माझा विश्वास बसत नाहीं म्हणून विचारतोंय्. हे–हे तुम्हीं केलंत ?

**हरिभाऊ** : ( घाबरून ) काय ? ( मामा त्यांना ती बेशुद्ध दुक्कल दाखवतो. ) मामासाहेब ? 'हें फल काय मम तपाला ?' ही थाप नाहीं ना?

**मामा** : अहो, थापा या खोटया गोष्टींच्या मारायच्या असतात. पण हें कसं झालं बुवा !

**हरिभाऊ** : ( आतां जिवांत जिव आल्यामुळं ) कुस्तीच्या या प्रकाराला डार्क–स्टाइल असं म्हणतात. हर्षांच्या घराण्यांत ५७ सालच्या बंडापासून हा प्रकार रूढ आहे. शिवाय हर्षांचं घराणं' –आधीं केलें मग सांगितलें'–या प्रवृत्तीचं आहे. गेले ३ दिवस या फ्री-स्टाइल्याला माझी ही डार्क-स्टाइल दाखवायची मी संधि पाहात होतों. आज बरा सांपडला. आणि या गाड्याबरोबर या नळ्यालाहि यात्रा घडली.

**मामा** : पण यांची आतां स्मशानयात्रा काढायचा प्रसंग येणार ना ?

**हरिभाऊ** : मुळींच नाहीं. तुम्ही फक्त एकच करा कीं, हे आडव्याचे उभे व्हायच्या आंत पोलिस–मजकुरांना बोलवा. नाहीं तर मलाच उभ्याचा आडवा व्हायची वेळ यायची. पण थांबा. आधीं आमच्या भावी सासूबाईंना एकदां आपल्या जांवयाचा हा पराक्रम पाहून घेऊं द्या. कारण अशी वेळ पुन्हां यायची नाहीं. आणि आली आहे तीच वेळ किती वेळ टिकेल याची शाश्वति नाहीं. ममीसाहेब—

**ममी** : ( प्रवेशून ) हरिभाऊ–तूं– तुम्ही हें केलंत ?

**हरिभाऊ** : Yes ! या एकटया रावणानं या दोन शनिग्रहांना पालथें घातलें. ते पालये आहेत ते उलथायच्या आंत आपल्या कन्याराशीला बोल्वा. नूतन—

**नूतन** : ( प्रवेशून ) हरिभाऊ–तुम्हांला कुठं लागलं तर नाहीं ना ? हरिभाऊ–तुमच्या शक्तिसामर्थ्याची आज मला कल्पना आली.

हरिभाऊ : छे छे ! माझ्या शक्तिसामर्थ्याची खरी कल्पना तुम्हांला यायला अजून अवकाश आहे. आतां त्या झेलम नदीचा लोंढा इकडं यायला हवाय्. तिलाहि दाखवतों ही डार्क स्टाइल. आणि तिला खडसून बजावतों कीं—मैं भी मामाका पठ्ठा हूं —और झाराका उस्ताद हूं ! ( तोंच हातांत हार घेऊन मिस् झेलम व शंखनाद येतात. )

झेलम : ( जवळ जात ) झारा—डिअर झारा—

हरिभाऊ : अहो झारा—मागं सरा. या एकट्या पठ्ठयानं तुमच्या या झाऱ्याचं उलथनं करून टाकलंय्— या नाऱ्याची वाचाच बंद पाडली आहे.

झेलम : (आश्चर्यातिरेकानं) काय ? तुम्ही एकट्यानं ? मेरे प्यारे हरि आज तुम्ही खरेखुरे मेरे प्यारे हरि झालात. आज खरीखुरी मी तुम्हारी झेलम झालें. पडद्यावरहि असं दृश्य यापूर्वी मीं कधीं पाहिलं नव्हतं. या झाऱ्याचा मत्सर जागृत करून—त्याच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्यासाठीं परवां मीं तुमच्यावर प्रेम असल्याचं नुसतं नाटक केलं, पण आज—आत्तां—तुमचा हा अतुल पराक्रम पाहून तुम्हीं मला जिंकून टाकलं आहे. दिल्‌बर— ही सिनेमांतली नक्कल नसून हे हृदयाचे अस्सल बोल आहेत. बोला— या रावणाच्या हातून या सीतेला सोडविल्याबद्दल मी तुम्हांला काय देऊं ?

शंखनाद : सीतामाई, मला एक मुलाखत द्या. त्यामुळें आमच्या अंकाला उठाव येईल. आमचा पगार तरी नक्की मिळेल. तुम्ही सीता—हे रावण—हे प्रभु रामचंद्र, वा—वा—या रामायणानींच उद्यांची 'टिमकी' भरून टाकतों. तें रामायण लिहून वाल्या कोळ्याचा वाल्मीकिमुनि झाला. हें रामायण लिहून या शंखनादाचा कमींत कमी शंखदेव तरी होईलच होईल.

झेलम : शंखदेव—एक सोडून माझ्या दहा मुलाखती घ्या. मुलाखती देणं हा मुळीं आम्हां नटींचा साइड—बिझिनेसच असतो. (तो लिहूं लागतो.) नटींचं जीवन—पैसे—विमे—कीर्ति—मोटारी—प्रेम व शीलं सुरक्षित राहायचीं असतील तर त्यांनीं असाच खराखुरा—बॉडीगार्ड नवरा निवडला पाहिजे. नटींच्या पैशावर जगणाऱ्या आइतखाऊ नवऱ्यापेक्षां जळीं—स्थळीं—काष्ठीं—हॉटेलीं—आमचा छळवाद मांडणाऱ्या साऱ्या पुरुषांचे मुडदे पाडणारा असा पुरुषोत्तमच नवरा आम्हांला हवा. बस्स ! ठरलं. हरिभाऊ, मी तुमच्याशींच लग्न करणार.

**नूतन** : मी करूं देणार नाहीं. झिंज्या उपटीन तुझ्या. माझं त्यांच्याशीं लग्न ठरलय्.

**झेलम** : ठरलंय् म्हणे. पाश्चात्यांच्या नादीं लागून नुसतीं ठरवून ठेवलेलीं लग्नं कशीं घातूक असतात, याचा या लग्नांनीं तुम्हां पौर्वात्यांना चांगला धडा मिळेल. हरिभाऊ—माझ्या सत्काराचे हे हार जरी उष्टे असले तरी माझं प्रेम मात्र ताजं आहे. Be ready ! ( जवळ जवळ जाते. तो मागं मागं सरतो. )

**हरिभाऊ** : थांबा. पुराणांत पुरुषांनीं बायकांना पळवून लग्नं केल्याचीं अनेक उदाहरणं आहेत, पण बायकांनीं पुरुषांना पळवून लग्नं लावल्याचं एकहि उदाहरण माझ्या माहितींत नाहीं, आणि म्हणूनच—कुंवारपणाला न शोभेल असं मी तुम्हांला कांहीं एक करूं देणार नाहीं. शिवाय हा जबरीविवाह होतोय्—

**झेलम** : नाहीं. जसा गांधर्व विवाह—वैदिक विवाह—राक्षस विवाह—पिशाच्च विवाह—रजिस्टर्ड विवाह, तसा हा नटी विवाह ! ( त्याला हार घालते, बाहेर कुठें तरी सनई वाजते, हा काकतालीय न्याय ! )

**नूतन** : ( रडत ) ममी—ममी—

**झेलम** : मेरे प्यारे हरि, आपण उटकमंड—दार्जिलिंग—गौरीशंकर इतकंच काय, पण तुम्ही बरोबर असल्यावर मी स्वर्गांतसुद्धां जाईन. ( झारासिंग शुद्धीवर येऊं लागतो. )

**हारिभाऊ** : झेलमबाई, या कुंभकर्णाला जाग येत चालली. हा अडला हरि तुमचे पाय धरतोय्. लवकर चला. एर्वीतेंवीं तुम्ही सौभाग्यवती झालाच आहांत तर आतां अखंड—सौभाग्यवती होण्यासाठीं ताबडतोब इथून काढता पाय घ्या. नाहींपेक्षां हे लग्नहार माझ्या मुडद्यावर घालायचा प्रसंग यायचा. नूतन—मी तुझा अपराधी आहे. ममीसाहेब—या मुक्या प्राण्यावर दया करा—मामा—काय बोलूं ! आपण करायला गेलों एक अन्—

**झेलम** : मामासाहेब आणि मंडळी—गुडबाय ! तुमचे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं. तुमच्या थांपांमुळेंच मला आज हा सोन्याचा दिवस दिसला. केव्हां केव्हां वाईटांतून सुद्धां चांगलं निघतं तें असं. या तुमच्या

उपकाराबद्दल माझ्या दर चित्राच्या ओपनिंगचे ३-३ फ्रीपासेस तुम्हांला पाठवीत जाईन मी. चीरिओ मंडळी. ( झेलम त्याला घेऊन जाते. )

**नूतन :** मम्मी, ते गेले. कायमचे गेले ग-त्यांचं तें तसं झालं-यांचं हें असं झालं-आतां माझं कसं होईल ग ?

**मामा :** काय व्हायचंय् ? लग्नाच्या भलत्या कल्पना उराशीं बाळगणाऱ्या वधूवराच्या लग्न-नाटकाचे असेच बाराच्या आंत तीन तेरा होऊन जातात. ( दोघी जातात. )

**झारासिंग :** ( उठून ) रेफरी-हमारा सामनेवाला कहां गया ?

**मामा :** सामनेवाला मेला. मिस् झेलमच्या खोलींत होता तो हा. ( शंखनादाकडे बोट दाखवतो. )

**शंखनाद :** (झारा जवळजवळ येतो तसा मागं मागं सरकतो). अहो, मी बाईची मुलाखत घेत होतों. तुमच्या पायां पडतों. मी तुमच्याजवळ कधींहि मुलाखत मागणार नाहीं. वाटलं तर ही पेन्सिल घ्या-ही वही घ्या. यापुढं तुमच्याजवळच काय, पण कुणाहि जवळ मुलाखत मागणार नाहीं. मामा-मलं वाचवा. ( तो आणि त्याच्या मागून झारासिंग पळतो. )

**नीतिन :** ( जाग येऊन ) इन्या -तो इन्या कुठंय् ?

**मामा :** तो नूतनला घेऊन केव्हांच पळून गेला.

**नीतिन :** मी त्याला सहकुटुंब ठार मारीन. [ धांवत जातो. ]

**मामा :** परमेश्वरा ! तुझी लीला अगाध आहे. आम्ही करायला गेलों एक अन्-

**पठाण :** [ टेलिफोन बिल घेऊन प्रवेशून ] टेलिफोन बिल ! [ मामा सरळ जाऊन झारासिंगाच्या सुऱ्यानं टेलिफोन कनेक्शन तोडून रिसीव्हर त्याच्या हातांत देतो. बिल चाळण्यांत गर्क असलेला पठाण अभावितपणें त्या तुटक्या फोनमध्यें ] हॅलो ओ बिल देते हैं ।

**मामा :** छान् ! करायला गेलों एक अन्--[ मामा अन् पडदा बरोबरच खालीं येतो. ]

**स मा प्त**